मंगल प्रकाशन-१

# जुना बाजार

(कथासंग्रह)

लेखक

गणपत खंडेराव पवार

ॐ

वर्षप्रतिपदा, १८६३

प्रथमावृत्ति ] मूल्य सव्वा रुपया [ २८ मार्च १९४१

प्रकाशक : —
शान्ताराम आठवले,
मंगल प्रकाशन,
टिळक रस्ता, पुणें २

[टीपः — प्रस्तुत कथासंग्रहांतील "दोन पिढ्यांतील अंतर" व "अदृश्य जखम" या कथांना इंग्रजीचा आधार आहे. इतर सर्व कथांतील प्रसंग, घटना व पात्रें सर्वस्वीं काल्पनिक आहेत.]

मुद्रकः —
कृ. ह. सहस्रबुद्धे,
श्रीज्ञानेश्वर प्रेस,
कोल्हापूर.

गुरुवर्य श्री. गोविंद केशव देशमुख

एम्. ए.; एल्एल् बी.; बी. टी.

हेड्मास्तर, मुधोजी हायस्कूल, फलटण,

यांस--

## श्री. ग. खं. पवार यांचें वाङ्मय

फुलपांखरें (कादंबरी)

उषा ( ,, )

ह्वेंतील मनोरे (लघुनिबंधसंग्रह)

जुना बाजार (लघुकथासंग्रह)

आगामी—

भग्न संसार (कादंबरी)





## 'प्रभात'चे प्रथितयश पद्यरचनाकार—

श्री. शान्ताराम आठवले यांचे काव्य-संग्रह

* एकलें बीज

* बीजांकुर

आगामी—

* सुमनें-फळें

# पांचशें रुपयांचा चेक!

" बाळ, एक–दोन आण्याचे पैसे आहेत का ? "

प्रश्न अगदीं साधा अन् क्षुल्लक! पण तो विचारतांना सगुणाबाईना केवढें तरी भय वाटत होतें व मनावरहि खूप मोठें दडपण पडल्यासारखें झालें होतें त्यांना.

आणि मग त्या प्रश्नाचें चटकन् उत्तर न आल्यामुळें तर त्यांची ती भीति अधिकच वाढली अन् आपण हा प्रश्न उगीचच केला असें त्यांना होऊन गेलें.

दोन-तीन मिनिटें झालीं, तरी प्रश्नाचें उत्तर न आल्यानें त्याच पुढें म्हणाल्या, " बरं, नसतील तर राहूं दे–पण हें काय ? शेवटचा भात तरी घेशील कीं नाहीं ?–कुठली मला अवदसा आठवली नि तुला भलत्याच वेळीं प्रश्न विचारला. "

या साध्या प्रसंगानें माउलीच्या नेत्रांत पाणी सांचलें–हृदयांत आगीचा भडका उडाला! पण ती आग विझविण्यासाठीं नेत्रांतलें पाणी थोडेंच पुरें पडणार होतें!

कसेंबसें आंचवून केशवने त्रस्तपणें प्रश्न केला, "कशाला हवे आहेत पैसे ?"–आणि प्रश्न विचारताना त्याची मुद्रा केवळ त्रस्तच नव्हे, तर प्रेमळ मातेनें दोन आण्याची याचना केली असतां ती आपणाला पुरी करता येत नाहीं हे पाहून कोणाहि निष्कांचन माणसाला जितकें दुःख होईल, त्याची जी अवस्था होईल, त्याच अवस्थेची भयाण उद्विग्नता त्याच्या चर्येवर पसरली होती.

"कशाला नाहीं–म्हटलं आज श्रावण सोमवार आहे; देवाला काहीं तरी..." त्याच भीतियुक्त खालच्या आवाजांत उत्तर आलें.

"हुं! म्हणे देवाला काहीं तरी–दगडाच्या देवाला माणसाच्या जिवाबद्दल काहीं वाटत असतं, तर कीं नाहीं? देव! कुणाला ठाऊक कुठं आहे तो! त्याला जर माणसाच्या जिवाची फिकीर नाहीं, तर माणसानीं तरी त्याची पर्वा का करावी ?–"

आणखी तो किती तरी त्यावरच बोलत राहिला असता; पण सगुणाबाईंना त्याची ती अवस्था पाहवेना. संतापानें त्याच्या रुंद कपाळावरच्या त्याच त्या टराविक दोन शिरा खूप फुगल्या होत्या नि त्या आतां फुटणार असें वाटत होते. म्हणून सगुणाबाईच मध्यें म्हणाल्या,

"अरे, पण एवढा जिवाचा त्रागा नि संताप करून घ्यायला काय झालं तुला? विचारूं नये, पण चुकून विचारलं त्यांत एवढं रागावण्यासारखं काय आहे? चुकले बरं मीं–क्षमा मागते मी तुझी–"

पण शेवटचे शब्द नीटसे त्याने ऐकले कीं नाहीं कोण जाणे! आणि ऐकले असले तरी त्या शब्दातील आर्द्रता त्याला जाणवली असावी असेंहि वाटत नाहीं. कारण हाच जर दुसरा एखादा प्रसंग असता व सगुणाबाईंनीं हे उद्गार काढले असते, तर त्याचें हृदय पिळवटून निघालें असते; त्याचें अंतःकरण दुभंगलें असतें! पण त्या शब्दांचा परिणाम होण्याइतपत त्याचें मन ठिकाणावर नव्हतें. ते शब्द पुरते त्याच्या कानांवर पडण्यापूर्वीच तो तेथून निघून गेला होता.

त्या उद्विग्न मनःस्थितींतच त्यानें खुंटीवरील कोट उचलला व एकदां जोरानें झटकला. गरीब माणसांच्या जीर्ण व फाटक्यातुटक्या कपड्यांवर धूळदेखील बसत नसावीसें वाटतें; कारण धूळ झाडण्यासारखें त्यावर कांहींच नव्हतें. तसाच त्यानें तो अंगावर चढविला, पण तो घालताना त्याचें चित्तच ठिकाणावर नसल्याकारणानें पाठीवर विरलेला कोट अधिकच टरकला—पण त्याचीहि त्याला दखलगिरी नव्हती.

अनेक ठिकाणीं शिवल्यामुळें गोधडीचें रूप घेतलेल्या वहाणा त्यानें पायात घातल्या व 'ऑफिस'चा रस्ता धरला. नेहमींप्रमाणें आज त्याने सगुणाबाईंना विचारलेंहि नाहीं !

गरीब बिचारी आई ! मातृहृदयच तें ! मुलाच्या त्या दुःखमय जीवनाची करुण अवस्था तिला उघड्या डोळ्यांनीं कशी पाहवणार ?

सारे प्रसंग डोळ्यासमोर उभे राहून तिने ढसढसा अश्रु गाळावयास सुरुवात केली आणि सारा दोष आपल्या माथीं फोडून घेतला.

रमाकातचें जेवण झाल्याबरोबर त्या आपलें वाढून घेत व जेवायला बसत. पण त्यांना आज जेवण सुचणेंच शक्य नव्हतें ! सकाळपासून पोटात पाण्याचा एक थेंबहि गेला नव्हता, पण डोळ्यांतून मात्र अश्रूंचा पूर वाहत होता.

त्याच विपण्ण आणि खिन्न अवस्थेंत त्यांनीं सारी दुपार घालविली.

[ २ ]

"काय रमाकांत, कारखाना तुमच्या घरचा समजलांत काय वाटेल तेव्हा यायला ? किती वाजले ते आहे का ठाऊक ? दहा वाजलेत—ऑफिसची वेळ साडेनऊ आहे हें विसरलात वाटतं ! बेंद्रे, रमाकांताचा आज अर्धा खाडा मांडा बरं का ! अन् हें पहा रमाकांत, आजपर्यंत तुमची म्हणून गय केली; दुसरा कोणी असता तर

चौपदरी हातांत देऊन दारोदार हिंडायला लावलं असतं! पुन्हां असं हें नाहीं चालायचं! पैसे द्यावे लागतात तुम्हांला. फुकट नाहीं म्हटलं काम करीत तुम्ही इथं! हं, जा लागा कामाला!"

देव आणि भांडवलदार—दोघेही सारखेच! मघांशीं देवाचा संताप आला होता त्याला—आतां भांडवलवाल्या मालकाचा!

मालक! अन्नाचा पोशिंदा! टीचभर पोटाची खळगी भरणारा दाता!

या विचारानें भेसूर हास्य पसरलें त्याच्या तोंडावर. त्याला माहीत का नव्हतें त्याचा मालक 'मालक' कसा झाला तें? गोरगरिबांच्या रक्ताचे रतीब त्याला लागलेले आहेत हें त्याला सर्व माहित होतें. तसेंच दररोज अर्धा—पाऊण तास घड्याळ पुढें करून गरीब मजुरांना पिळून काढण्याची कलाहि याच मालकाच्या अंगीं आहे ही गोष्ट का तो विसरला होता?—आणि—आणि कामाचे पैसे!—साऱ्या जगापेक्षां कमी वेतन; आणि तेंही चार—चार महिने पहावयास मिळत नसे! कशाच्या जीवावर माणसानीं जगावे व दारिद्र्याचे कष्ट सहन करावे?

पण आशा!—

आशा माणसाला सोडीत नसते अखेरपर्यंत! मृत्यूचे पाश पडले असतांहि जगण्याचीदेखील त्याला भोळी आशा वाटत असते. त्याच आशेच्या अंधुक किरणांत रमाकांतसारखे असंख्य जीव त्या 'मालकाच्या' कारखान्यांत व कारखान्याबाहेरील विस्तीर्ण जगांत चांचपडत होते—धडपडत होते! ठेंचा खाऊन तोंड रक्तबंबाळ झालें तरी तिथल्या तिथेंच खुडखुडत होते!

खालच्या मानेनें रमाकांत आपलें काम करीत होता.

तो काय लिहीत होता हें त्याचें त्याला तरी कळत होतें किंवा नाहीं कोण जाणे; पण त्याच्या भीषण भवितव्यतेचीं भयानक चित्रें मात्र त्याच्यापुढें उमटत होतीं—

त्याच्या आईनें त्याला एकदां सांगितलें होतें कीं, त्याच्या अगदीं लहानपणीं तें कुटुंब खूप–खूप सुखी होतें. इतकें कीं साऱ्या जगाला हेवा वाटावा ! पैसा होता, ऐश्वर्य होतें, सारें कांहीं होतें !–पण देवाला नाहीं पाहवलें तें ! त्याचे वडील एकाएकीं आजारीं पडले व त्यांच्या जीवाची मुळींच आशा राहिली नाहीं. त्यांना हें जग सोडून जाताना किती तरी दुःख वाटत होतें. तरुण, प्रेमळ, सुस्वभावी पत्नी, दोन जीवांचें एकमेव आश्रयस्थान, जीवाचा कलिजा या सर्वांना सोडून जातांना–कायमचें त्यांच्यापासून दूर होतांना किती यातना झाल्या असतील त्याच्या मनाला ! पण दैवाबरोबरच देवहि उलटला होता. म्हणे देवाला चांगलीं माणसें आवडतात म्हणून तो चांगल्या माणसांना आपल्याजवळ बोलावून घेतो–मग तोच या जगात येऊन कां राहत नाहीं ?–सारें जगच तो चांगल्या माणसांचें कां करीत नाहीं ? बालपणीं ही विचारसरणी रमाकांताला पटे; पण पुढें पुढे जसजसे त्याला अधिकाधिक दुःखाचे खडतर पहाड चढून जावे लागले, त्या त्या वेळीं त्याला वाटूं लागलें, कीं देवाची कल्पनाच मुळीं भ्रामक आहे. या जगावर देवाचें राज्य नसून त्यावर सैतानाचेंच असलें पाहिजे, आणि म्हणूनच तो जगातल्या चांगल्या माणसांना दुःख देतो व त्यांना या जगातून उचलून नेतो. तसें नसतें, तर भरल्या संसारांतून आपले वडील निघून कां जाते ?

पण दुःखाचा फेरा इथेंच संपावयाचा नव्हता. दैव आणि सैतान हे दोघेहि एका बाजूला राहून त्याच्याशीं सामना खेळत होते–त्याला पुरेपूर छळून घ्यावयाचें होतें त्यांना; आणि म्हणूनच कीं काय, आपल्या पश्चात् आपल्या तरुण पत्नीला व लाडक्या बाळाला त्रास होऊं नये म्हणून त्यांनीं आपली सारी मिळकत आपल्या मित्राच्या हवालीं करून आपल्या पत्नीचा व मुलाचा योगक्षेम चालविण्यास त्यांनीं सांगितलें होतें.

कांहीं काल बरा गेला; पण लक्ष्मी चंचल असते म्हणतात ना! या बाबतींत तरी ती कशी स्वस्थ राहील? रमाकांताच्या वडिलांच्या मित्राच्या मनांतहि तिनें संचार केला व मग शेवटीं व्हायचें तेंच झालें!

मित्रानें मित्राचा गळा कापला!

सगुणाबाई–रमाकांत उघडीं पडलीं!

दैवानें–सैतानानें पुरा सूड उगविला!

आईनें सांगितलेली सारी हकीकत त्याच्या अंतश्चक्षूंसमोर दिसत होती. सिनेमा पहात असतांना सारे दिवे मालवले जातात, दूर कुठून तरी एका छिद्रातून प्रकाश येतो नि मग पडद्यावर चित्रें हालूं–दिसूं लागतात, तसेंच रमाकांताच्या मनाचें झालें होतें. त्याच्या नेत्रापुढें बाहेरील जगाचा प्रकाश दिसत नव्हता आणि म्हणूनच अंतःपटावर दूरचीं विचारकिरणें येऊन पडत होतीं व त्यामुळे त्याला त्याच्या गत जीवनाचीं चित्रें स्पष्ट दिसत होतीं.

"काय रमाकांत, कसल्या विचारांत गढून गेलां आहात?– हो! तुम्ही लेखक आहात नाहीं का? एखाद्या कादंबरीचं कथानक जुळवीत आहांत वाटतं? त्यावर आपण खूप पैसा मिळवूं अन् मग एक बंगला बांधूं असं वाटत असेल नाहीं तुम्हाला? हो! निदान तूर्त हवेंतले तरी बंगले बांधून घ्या–मग पुढं खऱ्या बंगल्यांचं पाहतां येईल!"

म्हाताऱ्याच्या या वटवटीचा रमाकांताला खूपच संताप आला होता. वाटत होतें कीं, उठावें व फाटक्या वहाणाचे सपासप दहा–वीस–तीस फटके मारावेत त्याच्या मुस्कटात! पण तो कांहीं आडदांड स्वाभिमानी मजूर नव्हता! मुर्दाड बनलें होतें त्याचे मन त्याच्या शिक्षणामुळें! अन् त्याचें शरीरहि!

गप्प–गप्प ऐकून घेतलें त्यानें तें सारें कांहीं!

" हं ! आणा पाहूं ! आज काय काय दिवे लावलेत ते पाहूं तर द्या आम्हाला ! हो ! नाहीं तर घ्या काय तुमचं ? चुकारतट्टू माणसं तुम्ही. वेळेची किंमत कुठली असायला तुम्हांला ! "

रमाकांताला चटकन् आठवण झाली, दहा तासांचा दिवस व सुटण्याच्या वेळीं घड्याळाचा आकडा अर्धा तास मागे ! संतापाची जोराची उसळी उठली त्याच्या मस्तकात; पण समुद्राच्या भरती-प्रमाणेच गुलामगिरींत खितपत पडणाऱ्या सुशिक्षित माणसाच्या संतापाची लाटहि त्याच्या चेहऱ्यावरून पलीकडे जाऊ शकत नाहीं ! साऱ्या जगालाच बंधनें आहेत म्हणतात ना ! तशाचपैकीं काहीं तरी !

" अन् हे हो काय ? तुम्हाला कारखान्याचे हिशोब पहायला सांगितले होते, तुमच्या घरचा जमाखर्च नव्हे ! "

आणि खरेंच ! गेल्या चार महिन्यांत मालकाकडून एक कपर्दिकाहि मिळाली नसल्याकारणानें कोणाकोणाचीं किती बिलें द्यावयाचीं आहेत आणि आणखी किती दिवस हातीं पगार आला नाहीं तर किती बिलें अधिक वाढतील याचाच त्यानें मेळ घालण्याचा प्रयत्न चालविला होता !

" वा ! खूप कामं करता ! हरामाचे पगार घेता वाटतं ! त्यात तुमचं काय जाणार आहे ! नुकसान होणार आमचंच ! तें काहीं नाहीं ! बेद्रे, याचा आजचा, कालचा नि उद्यांचा असे तीन खाडे मांडा ! अशीच खोड मोडली पाहिजे या माजोऱ्याची ! "

आणि असेंच जीवन चाललें होतें रमाकांताचे दिवसेंदिवस !

साऱ्या जगात बदल होत असतो म्हणतात—पण काहीं कांहीं माणसांच्या जीवनात तसा काहींच होत नाहीं !—होत नाहीं कसा ? रमाकांताचेंच पाहा ना ! त्याची कालची स्थिति आज नाहीं ! पण हो ! जसा दिवस जाईल तसे त्याला वाटायचें—कालचा दिवस बरा होता. मग आहे कीं नाहीं त्याच्या जीवनांत बदल ?

[ ३ ]

पण खरोखरच दैव माणसाच्या मागें कुत्सितपणें हंसत असतें ! तें म्हणतें, ही परिस्थिति तुला नको–याच्या अगदीं उलट तुला हवी ना? तरी हरकत नाहीं! तथास्तु! पण त्याच वेळीं तें मनाशीं खूण-गांठ बांधून ठेवीत असतें, कीं तिच्यांतहि तुला दुःखाचाच वांटा मिळेल.

दुःखापासून सुखाची उत्पत्ति! हास्यास्पद विधान आहे हें–नाहीं? पण रमाकांताचेंच जीवन पहा ना !

दैवाला त्याची कींव आली, सारे ग्रह एकदम पालटले! शनि–मंगळादि दुष्ट ग्रहांनीं त्याच्या कुंडलींतून पलायन केलें व रमाकांताचा भाग्योदय झाला.

त्याच्या मालकानें एकदां त्याचेविषयीं काढलेले उद्गार खरे होण्याची वेळ आली !

त्यानें एक कादंबरी लिहिली–त्याच्या जीवनाचें सार होतें तें! पण कोण प्रकाशित करणार ती? त्याच्या माहितीचा एक बडा छापखानेवाला होता. त्याचा मुलगा त्याच्याच वर्गांत लहानपणीं शिकत होता व ते दोघेहि मित्र म्हणवीत असत एकमेकांना! रमाकांताला त्या मित्राची एकदम आठवण झाली व गेला त्याचे-कडे कादंबरीचें बाड घेऊन !

त्या दोन बालमित्रांची आज बऱ्याच दिवसांनंतर भेट झाली होती–दोघांनाहि आनंद झाला होता त्या भेटीमुळें !

हवापाण्याच्या व इतर मामुली गप्पासप्पांनंतर रमाकांतानें हळूंच दबकत दबकत आपल्या मनांतील गोष्ट उघड केली.

" अरे वा! कादंबरी का लिहिली आहेस तूं? छान! छान!! शाळेंत असतांनाच तुझा हा गुण दिसून आला होता म्हणा !—" मित्र मानभावीपणानें हंसत म्हणाला.

"गुण कसला आला आहे–पण, मनाच्या समाधानासाठीं म्हणून कांहीं तरी लिहिलंय् झालं! पण—" रमाकांताची गाडी वाटेवरच अडली.

"पण काय?—"

"कांहीं नाहीं. छापून काढावी म्हणतों मी; अन् म्हणूनच तर आलों आज वेळ काढून!" अगदीं मनावरचें दडपण कमी झाल्याप्रमाणें झालें त्याला हें बोलल्यानंतर.

"काय?–छापून काढणार आहेस? बरेच पैसे जमविलेले दिसतात. कांहीं हरकत नाहीं. येईल फार तर चारपांचशें रुपये खर्च-छपाईला! जरूर छापून देऊं आम्हीं! मित्राचें काम करून द्यावयाचें नाहीं तर कोणाचें द्यावयाचें!—"

"पण—"

"अरे, पण–बीण कसला आला आहे? तुला म्हणून देऊं सवलतीनं छापून–शिवाय थोडेबहुत पैसे कमी असले तर दे मागाहून पुस्तकाची विक्री झाली म्हणजे!" व्यवहार बोलूं लागला.

"तसं नव्हे—" पण, भावना मध्येंच अडखळली.

जगांतल्या धकाधकीला अगदींच नालायक होता तो! त्याला त्याचा तरी काय इलाज?

भावना आणि व्यवहार–छत्तीसाचा आंकडा आहे दोहोंचा!–जसे कांहीं गरीब आणि श्रीमंतच!

"तसं नव्हे तर मग कसं?" छद्मीपणा बोलला.

"नाहीं–मी म्हणत होतों–तुम्हीहि मधून मधून प्रकाशनाचा धंदा करतांच; तेव्हां—"

"तेव्हां काय?" व्यवहार पुन्हां मध्यें आडवा पडला, "आम्हीं तुझी कादंबरी प्रकाशित करावी म्हणतोस? वेडा आहेस झालं! अरे, तुझ्यासारख्या नवख्या अन् अननुभवी लेखकाची कादंबरी

प्रकाशित करून आमच्या छापखान्याचा गुदाम कां बनवायचाय् आम्हांला? छे बुवा, नको ही भलतीच भीड घालूंस! अरे, हल्लीं कथा-कादंबऱ्यांना नि काव्य-नाटकांना विचारतो कोण बाजारांत? तुम्हा लोकांचा भ्रम आहे हा निव्वळ!-बरं! चहा घेणार कीं सरबत?"

मित्रच कां हा?-रमाकांताला संशय पडला.

पाटींत सुरा खुपसायचा नि पुढून म्हणावयाचे-'मलम देऊं कां लावायला?' कसला निर्दय चांगुलपणा हा!

पण, बिचारा रमाकात!-भावनाप्रधान नि व्यवहारी जगाच्या दृष्टीनें अजाण तरुण होता तो! त्याला काय माहीत जगाचा व्यवहार नि बाजार!

खूपच निराश झाला तो नि ओशाळलाहि पण!

"मी घेत नाहीं चहा!-नि सरबतहि नको!"

"वा! असं कसं? चहा घेत नसलास तर सरबत तरी घेतलं पाहिजे! कां दूधच मागवूं?"

"खरंच कांहीं नको मला!"

"फारच बुवा परकेपणा दाखवितोस तूं? अच्छा, तुझी मर्जी!-मग काय म्हणणं आहे तुझं?"

"माझं म्हणणं काय असायचं! पण, मला वाटतं तूं एकदां हें हस्तलिखित वाचून तर पहा-पडली पसंत तर छाप, नाहीं तर आग्रह नाहीं माझा! निष्कारण तुला खर्चांत आणण्याचा माझा हेतु नाहीं-"

"माफ कर बुवा! दुसरं काहींहि म्हण, पण मला नको ही शिक्षा देऊंस हस्तलिखित वाचण्याची! अरे, माझ्या मागं थोडींथोडकीं कां कामं आहेत?"

रमाकांताच्या चर्येवर कमालीची खिन्नता पसरली. कसल्या तरी विचारांत गर्क झाल्यासारखा दिसला तो!-पण छे! विचार कुठले

शिरायला त्याच्या मनांत ! विषण्ण मनानें तो जमिनीवर खालीं कुठें-तरी पहात होता. बहुतेक त्याला वाटत असावें—ही जमीन दुभंगून जर तींत आपण गडप झालों तर ?—पण तसें कुठलें घडून यायला !

त्याला वाटत होतें—आपली ही कादंबरी प्रसिद्ध होताच साऱ्या महाराष्ट्रांत खळबळ उडून जाईल नि मग आपण खूप खूप प्रसिद्धीस येऊं अन् मग—वगैरे वगैरे !

“ बरं तर मग, जातों मी. तसदीबद्दल...” पण पुढचे शब्द त्याच्याच्यानें उच्चारवेनात !

माफी मागावयाची ?—अन् ती काय म्हणून ?—म्हणून पुढें तो कांहींच बोलला नाहीं !

साध्या औपचारिकपणाचीहि त्याला आता किळस आली होती.

कादंबरीचें बाड काखेंत मारून तो जागेवरून उठला व मुकाट्यानें चालूं लागला.

त्याच्या मित्राला काय वाटले कोणास ठाऊक !—कीं हे सारें रंगभूमीवरील अभिजात नटाप्रमाणे करावयाचे हें त्याचे टरलेलेंच होतें कीं काय न कळे—पण, त्याने हांक मारली—

“ ए रमाकात ! थांब की जरा ! ”

तो परत फिरला—अगदीं यंत्रासारखा ! त्यानें आतांच पाहिलें होतें—छापखान्याचें यंत्रदेखील असेंच मागें पुढें होत होते—पण कुणाच्या प्रेरणेनें ? एंजिनच्या ?—नव्हे !—मालकाच्या !

“ पाहूं तर खरं काय एवढं लिहिलं आहेस ते ? ” मित्राने सौजन्य नि औदार्याचा आव आणून विचारलें.

त्यानें तें बाड त्याच्या हातांत दिलें.

“ बरं, राहूं दे ! तुझ्यासाठीं म्हणून पाहतों वाचून. कांहीं झालं तरी तूं माझा लहानपणचा मित्र आहेस—तुझ्यासाठीं आम्ही एवढं-देखील करायचं नाहीं म्हणजे काय ?—पण, हें पहा, तें मी छापीनच

याचा भरंवसा नाहीं अं ! नाहीं तर उगीचच मनांत आशा धरून बसशील नि मग मला उगीच दोष देशील ! हो, आपलं आधींच स्पष्ट बोललेलं बरं ! मागाहून निष्कारण आपल्यांत वितुष्ट नको !— कांहीं झालं तरी व्यवहार आहे हा ! व्यवहारासाठीं माणुसकी नि मैत्री गमावण्यांत काय अर्थ आहे ? ”

रमाकांताला वाटलें—

देऊं कां याच्या थोबाडींत एक ठेवून ?

काय पाजी माणूस आहे हा !

पण, त्याला काय माहीत कीं,—

त्याचा मित्र हें बोलत नव्हता—तर पैसा बोलत होता !

गरिबी आणि लाचारी या अगदीं पाठच्या बहिणी आहेत. याचा त्याला अनुभव का नव्हता !

पण, तो कांहींच बोलला नाहीं—अन् बोललाहि—

“ कांहीं हरकत नाहीं. सावकाश पहा वाचून. कांहीं घाई नाहीं.”

असें म्हणून तो तेथून निघाला.

[ ४ ]

त्याच्या मित्रानें त्याची कादंबरी वाचून पाहिली. त्याला ती बेहद्द आवडली. कादंबरी छापून निघाली तर ती किती खपेल याचा त्यानें व्यापारी मेळ बसविला. हजार प्रती काढल्या तर किती नफा होईल याचा त्यानें हिशेब केला. पण त्याला नंतर वाटलें, हजार प्रतींनीं काय होणार ? तीन हजार तरी निदान काढल्याच पाहिजेत—एक वर्षांत उडतील त्या !

“ पण असं केलं तर—? ”

त्याच्या मित्राच्या मनांत एक गोडशी कल्पना येऊन गेली. त्याची चर्या प्रफुल्लित झाली.

'–हो त्याला काय हरकत आहे ?' तो विचार करूं लागला, "ही कादंबरी प्रकाशित करून आपला आर्थिक फायदा तर होणा-रच आहे, पण त्याबरोबरच आपली कीर्ति झाली–आपणाला नांव-लौकिक मिळाला तर ?–प्रकाशकापेक्षां कादंबरीकार म्हणविण्यांत केवढा गौरव आहे ! काय हरकत आहे त्याला ? या एकाच कादं-बरीनं आपण सबंध महाराष्ट्रांत प्रतिभावान् लेखक म्हणून प्रसि-द्धीस येऊं–पुढें मागें साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मानहि आपणाला खात्रीनें मिळेल !–आतां, दुसऱ्याचं मूल चोरून आणून तें आपलंच आहे असं मिरवण्यासारखं होणार आहे; पण नाहीं तरी या रमाकाताला विचारतो कोण ? बस्स, आपण या एकाच कादंबरीवर अव्वल दर्जाचे लेखक होणार ! वा ! काय पण आपला मेंदू आहे !'

अन् मग तो स्वतःच्या स्वतःवरच बेफाम खूष झाला.

'अरे, पण हो ! लोकांना संशय तर नाहीं ना येणार या वाङ्मय-चौर्याचा ? अन् शिवाय आमची शैक्षणिक लायकीहि माहीत आहे अलम दुनियेला ! डोळ्यांत धूळ फेंकून नि गळे कापून पैसे मिळवितां येत असले तरी बुद्धि कशी मिळवितां येणार ? शिवाय रमाकांतनेंच दुसऱ्या कोणाला हें बाड दाखविलें असलें तर ?–सारेंच बिंग बाहेर फुटणार ! जाऊं द्या झालं ! या जन्मीं नाहीं नशिबीं आपल्या तें ! मिळूं दे रमाकांताला प्रसिद्धी ! आपणाला भरपूर पैसे तर मिळतील ! अन् शिवाय रमाकांताला आपण थोडेंच याचे पैसे देणार आहोंत ?' मित्राचे विचार आहेत हे !

बरेच हेलपाटे घातल्यानंतर रमाकांताला एकदांचा होकार मिळाला !–मनस्वी आनंद वाटला त्याला. पैशाची अपेक्षा नव्हतीच म्हणा–फक्त प्रसिद्धी हवी होती.

सौदा ठरला–सौदा कसला ? दानच होतें तें ! पण, कायद्याच्या भाषेंत त्याला करार म्हणण्यांत आलें. साऱ्या अटी त्याच्या मित्रानेंच

पुढें मांडल्या ! रमाकांतानें फक्त कबुली द्यावयाची होती. कादंबरीवर फक्त त्याचें नांव येणार होतें आणि शिवाय एक कादंबरीची प्रत मोफत मिळणार होती त्याला. मेहेरबानीच वाटली त्याला ती ! नाहीं तर त्यासाठीं वर पैसे द्यावे लागले असते तर घ्या काय ?

यथावकाश कादंबरी प्रसिद्ध झाली. अपेक्षेप्रमाणें खूप बोलबाला झाला तिचा. मराठी वाङ्मयक्षितिजावरील नवोदित तेजस्वी तारा म्हणून रमाकांताचा गौरव झाला.

त्याला वाटलें–आपले नशीब पालटलें !—

[ ५ ]

आणखी काहीं काळ लोटला. या लौकिक सुखांत तो आपलें दुःख विसरत होता आणि तें कायमचें विसरण्यासारखी परिस्थिति येत चालली असें त्याला वाटूं लागलें.

नाहीं म्हणावयाला त्याला या दुःखात एकट्याला सोडून त्याची आई देवाच्या घरीं गेली होती. देवानेंच तिला नेलें होते. आईच्या मृत्यूने त्याला भारी दुःख झालें. कितीक दिवस तर त्याची अगदीं वेड्यासारखी स्थिति झाली. आपल्या आईला आपण एक क्षणभरहि सुखी करूं शकलों नाहीं हें शल्य त्याला सतत टोंचत होतें–पण एक प्रकारचा अज्ञात आनंदहि त्याला झाला. या यातनांतून ती बिचारी सुटली. माझ्यासारख्या हतभाग्याजवळून तिला कसलें सुख लाभणार होतें ? जें कांहीं होत असतें तें आपल्या बऱ्यासाठींच असतें !–त्याचा नेहमींचा हा शुष्क वेदांत होता !

कादंबरीचें कथानक अत्यंत हृदयंगम आणि चटकदार होतें. वर्तमानपत्रांतील बोलबाला ऐकून एका फिल्म कंपनीच्या डायरेक्टरनीं ती वाचून काढली व तें कथानक आपल्या बोलपटासाठीं घेण्याचें त्यांनीं ठरविलें.

त्याप्रमाणें रमाकांताच्या घरापुढें एके दिवशीं कंपनीची मोटर येऊन उभी राहिली !

रमाकांत त्या दिवशीं घरींच होता. त्याला मोटर पाहून आश्चर्याचा धक्काच बसला ! तो चटकन् बाहेर आला.

" आपणच का ते रमाकांत कादंबरीकार ? "

" हो ! मीच. काय काम आहे आपलं ? "

" मी * * * * कंपनींतून आलों आहे अन् आमच्या दिग्दर्शकानं आपणासाठीं हें पत्र दिलं आहे !! "

थरथरत्या हातानें तें त्यानें घेतलें, वाचून पाहिलें. विश्वास बसेना त्याचा त्या पत्रावर व स्वतःच्या डोळ्यावर ! भांबावला बिचारा !

" मग काय, येणार ना ? " त्या मोटरींतील व्यक्तीनें त्याला त्याच्या तंद्रींतून जागे केले.

" हो ! येईन कीं; केव्हां येऊं ? " त्याला वाटलें पायीं जावयाचें म्हटलें तर एक तास तरी लागावयाचा कंपनीपर्यंत जावयाला. म्हणून तो विचारात पडला.

" आताच—माझ्याबरोबर मोटरींतून—"

" अं ! " आश्चर्याचा दुसरा धक्का !

* * *

त्याच्या कादंबरीवरून घेतलेला चित्रपट पुरा झाला. जाहिरात खूप केल्यामुळें पहिल्या दिवशीं खेळाला खूप गर्दी झाली होती. कांहीं वेळानंतर सर्व तिकिटें संपून गेलीं.

रमाकांत आधींच येऊन चार आण्याचें तिकिट काढून बसला होता.

चित्रपट बहारीचा वठला होता. प्रेक्षकांच्या भावना क्षणाक्षणाला हेलावत होत्या—त्याबरोबर त्याचेंहि मन हेलावत होतें.

चित्रपटांतल्या नायकाची आई आजारी पडली आहे व तिच्या दरिद्री मुलाला तिच्या औषधपाण्याचीहि सोय करतां येत नाहीं व त्यांतच तिचा अंत होतो असें एक दृश्य चित्रित करण्यांत आलें होतें. तो प्रसंग तर अत्यंत हृदयस्पर्शी होता. साऱ्या प्रेक्षकांच्या नेत्रांतून अश्रु वाहत होते—रमाकांतालाहि राहवलें नाहीं; त्याला मोठ्यानें हुंदका आला! आणि मग त्याला फार वेळ तेथें बसवलें नाहीं. तो जाग्यावरून उठला. बाहेर आला.

शेजारचे प्रेक्षक म्हणाले, "फारच हळव्या मनाचा दिसतोय् बिचारा!"

* * *

बोलपटाचीही खूपच स्तुति झाली. कोणी लेखकाला श्रेय देऊं लागला, तर कोणी कंपनीला! एवंच रमाकांताचा त्यांत मोठाच भाग होता.

कंपनीला खूप उत्पन्न होऊं लागलें.

एके दिवशीं रमाकांताच्या हातीं पोस्टानें पांचशें रुपयांचा चेक कंपनींतून आला.

पांचशें रुपयांचा चेक!

त्याचा आनंद पोटांत मावेना! तो सारें देहभान विसरला. आपण साऱ्या जन्मांत इतके पैसे मिळवूं ही कल्पनाहि त्याला नव्हती—त्याच्या आजपर्यंतच्या जीवनानेंच त्याला तें पटवून दिलें होतें; आणि म्हणूनच पांचशें रुपयांचा चेक पाहून त्याला हर्षोन्माद होण्याची पाळी आली व त्याच भरांत हातांत चेक घेऊन तो स्वयंपाकघरांत अगदीं धांवत गेला व—

"आई, ए आईऽअ! हे पाहिलेस का किती रुपये मिळाले आहेत मला?"

—पण घरांत कोण होतें?

भ्रम !

स्वयंपाकघरांत कोणीच नव्हतें. फक्त भयाणता होती !

आणि त्याच्या प्रश्नाचें उत्तरहि त्याला मिळालें नाहीं. त्याच्या अंतःकरणाला दुसऱ्या अंतःकरणाची साद मिळाली नाहीं.

त्याला जोराचा धक्का बसला !

छातींत एकदम धस्स झालें !

डोळ्यांपुढें अन्धेरी आली, काजवे चमकले !

मटकन् तो खालीं बसला !

पैसे मिळाले, पण जिला सुखी करूं अशी तीव्र महत्त्वाकांक्षा त्यानें मनांत बाळगली होती, ती त्याची आई आज कुठे होती ?

आता कोणासाठीं पैसे मिळवावयाचे ? मला या पैशांचा उपयोग काय ?–मग माझ्या जीवनांत तरी काय राहिलें आहे ?

रमाकांताच्या या प्रश्नांचीं उत्तरें कोण देऊं शकेल ?

त्याच भ्रमांत त्यानें हातातील चेकचे फाडून तुकडे तुकडे केले !!

---

# अन्तरींच्या यातना !

अंतरपट बाजूला सारला गेला. वधूवरांनीं एकमेकांच्या गळ्यांत पुष्पहार घातले. मंगल वाद्ये वाजूं लागलीं. सुधाकराच्या मुखावर आनंदाच्या गोड लहरी उठल्या. त्याला अगदीं स्वर्ग—छे !—स्वर्गांतील अप्सराच लाभल्याचा हर्ष झाला. तो आपलें सारें देहभान विसरला आणि पुढ्यांत उभी असलेल्या शान्ताकडे अनिमिष नेत्रांनीं रोखून पाहूं लागला. त्या वेळीं त्याच्या नेत्रांत सामावलेले भाव कुठल्या तरी अननुभूत अशा मोहिनीनें भारावले होते. त्याला झालेला मनस्वी आनंद त्याच्या नेत्रांतील अणू—अणूंतून बाहेर ओसंडून पडत होता. त्या आनंदकिरणांच्या द्वारें जणूं काय तो शान्ताची सौंदर्यमूर्ति आपल्या हृदयांत आकर्षून घेत होता. तिच्याशीं त्या अवस्थेंत एकरूप पावण्याची तो पराकाष्ठा करीत होता.

—पण, शान्ताला काय वाटत होतें ? तिला काय वाटत होतें हें सांगणें कठीण आहे. सागराच्या तळाशीं काय काय सामावलेलें आहे हें कोणाला तरी माहित आहे का ? आकाशाचें पृथक्करण

करून त्याच्या हृदयांत काय भरलें आहे याचा कधीं शोध लागला आहे ? स्त्रीचें मनहि अगदीं असेंच आहे. स्त्रीच्या-त्यांतूनहि नवोढा तरुण स्त्रीच्या-मनाचा थांग कोणालाच लागत नाहीं. शांताच्याहि मनांतील भाव ओळखणें कठीण होतें. लज्जेनें म्हणा वा मनावरील असह्य दडपणामुळें म्हणा, तिनें बोहल्यावर उभें राहिल्यापासून खालीं मान घातली होती. अगदीं सुधाकराच्या गळ्यांत पुष्पमाला घालण्याच्या वेळींहि तिनें वर मान करून पाहिलें नाहीं, कीं आपले भाव प्रगट केले नाहींत. जवळपासच तिच्या काहीं मैत्रिणी व इतर स्त्रिया उभ्या होत्या. " भारीच बाई लाजरी शान्ता !" असें म्हणून त्यानीं प्रसंगानुकूल विनोद केला. पण, अगदीं जिवाभावाच्या मित्र-मैत्रिणींनीं देखील केलेला विनोद कित्येक वेळां अन्तःकरणाला भेदून जात असतो; तसेंच शान्तालाहि झालें कीं काय कोणाला ठाऊक ! पण, तिनें अधिकच मान खालीं घातली. त्यांतच कपाळावरील मुंडावळ्यामुळें तिच्या मुखावरील भाव स्पष्टपणें कळणें अशक्य झालें होतें. स्त्रीचें मन लोण्याहूनहि मऊ असतें म्हणतात, पण प्रसंगीं ते वज्राहूनहि कठीण होत असतें कीं काय कोणाला ठाऊक !

अन् माधव ?—अगदीं कृत्यकृत्य झाल्यासारखें त्याला वाटलें ! त्याच्याहि चर्येवर समाधानाची एक सूक्ष्म छटा उमटली; पण आकाशांत खूप वादळ होण्यापूर्वीं किंचित्काल सूर्यप्रभा चमकावी, अगदीं तशीच त्याच्या मुखावरील ती समाधानाची छटा दिसत होती. आकाशांत खूप घनदाट काळेकुट्ट मेघ पसरावेत आणि मग पर्जन्यधारा वर्षवल्यानंतर आकाशाला हलकें वाटून सारें वातावरण ज्याप्रमाणें निवळावें, तसेंच माधवाचेंहि झालें होतें; पण हा भार हलका होतो न होतो तोंच आणखी कुठून तरी सोसाट्याचा वारा सुटावा नि पुन्हां काळे ढग जमावेत त्याप्रमाणें माधवचेंहि मन पुन्हा कसल्या तरी भावनांनीं भारावलें. अंतःकरण उफाळून आलें.

समुद्राला भरती आली म्हणजे त्याच्यावरील लाटा जशा जोरजोरानें किनाऱ्यावर जाऊन आदळूं लागतात, त्याचप्रमाणें त्याच्या मनांतील कोंडलेल्या भावना बाहेर फुटून निघूं लागल्या आणि त्या आवेगा-सरशीं तो इतका वेळ सुधाकराच्या पाठीशीं जो होता, तो एकदम तेथून निघाला; तें कोणाला समजून देखील आलें नाहीं. सारेच लोक कसल्या ना कसल्या तरी धादलींत होते. कोणाचें लक्ष असणार त्या लग्नघाईंत त्याच्याकडे ?

ती वेळच अशी होती, कीं सुधाकर देखील आपल्या जिवलग स्नेह्याला किंचित्काल विसरला ! जो स्वतःचें देहभानहि विसरला होता, त्याला इतराचे काहीं काळ विस्मरण व्हावें यात आश्चर्य-जनक असें कांहींच नव्हते. इतके दिवस हृदयाशीं जतन करून ठेवलेली प्रेममूर्ति साक्षात् समोर बसली असता त्याचें इतर कशा-कडे लक्ष असणार ? पुढें चाललेल्या धार्मिक विधीकडेहि त्याचें पुरेसें लक्ष होतें कीं नाहीं कोण जाणे ! कारण त्यांत त्याच्या हातून किती तरी चुका होत होत्या; पण त्याला त्याचें कांहींच वाटत नव्हतें. आपल्या प्रणयप्रतिमेशीं तो इतका एकरूप झाला होता, कीं त्याचें आतां कुठेंच लक्ष नव्हतें. लहान मुलांचें देखील असेंच नाहीं का होत ? अगदीं मातेच्या अंगावर खेळणारें मूल असलें, तिचा खूप लळा असला, तरी त्याच्या हातीं एखादी सुंदरशी बाहुली आणून दिली म्हणजे तें ज्याप्रमाणे प्रत्यक्ष मातेलाहि कांहीं काळ विसरून हातांतील त्या बाहुलीशीं खेळण्यांतच रमतें, याप्रमाणेंच, सुधाचीहि स्थिति झाली होती. माधव त्याचा अगदीं जिवाभावाचा मित्र ! दोन शरीरांत वावरणारे एकच जीव; एकाच्या पायात कांटा खुपला तर दुसऱ्याचें हृदय व्याकुळ व्हायचें; पण मित्रप्रेमापेक्षांहि आणखी एक प्रभावी प्रणयशक्ति या जगांत असूं शकते, तिचा मोह कोणालाच आवरतां येत नाहीं. तिचें आकर्षण मनाला वेड

लावीत असते. तिच्या दर्शनानें तरुण-मन प्रिय मित्रालाच काय, पण साऱ्या जगालाहि विसरायला लावतें याची स्वानुभूति सुधाकरला येत होती त्यात त्याचा कांहीं दोष नव्हता !

सारे धार्मिक विधि यथासाग पार पडले. सुधाकराला वाटलें, शांता आता आपली झाली-कायमची आपली झाली. तिच्या सुखद सहवासांत आतां; आपलें भावि जीवन अति आनंदांत जाणार! त्या आनंदाचें वलय त्याच्याभोंवतीं इतकें पसरलें होतें कीं, त्याला अगदीं स्वर्गसुखाचाच भास होत होता ! त्याला वाटलें हे स्वर्गसुख-शांताचा चिरंतन सहवास-आपल्या जीवनांत माधव नसता तर प्राप्त होऊं शकला असता का ?-पण हो ! माधव कुठें आहे ? दिसत नाहीं तो इथं कुठें ?—

—आता कुठें त्याला माधवची आठवण झाली आणि तें खरेंहि होतें. लहान मूल बाहुलीशीं खेळण्यांत दंग झालें म्हणून काय झालें ? त्याच्या मनाची आर्तता वाढली म्हणजे तें देखील शेवटीं "आई" म्हणून पुकारा नाहीं का करीत ?—

सुधाकराला वाटलें-माधव कुठें असेल तिथे त्याला शोधावें नि त्याला प्रेमभरानें कडकडून आलिंगन द्यावे-आनंदाश्रूंनीं त्याचे पाय धुवावेत ! त्याला सागावे-पण, काय सांगावे हें काहीं त्याला सुचलें नाही. अंतःकरण भरून आलें म्हणजे जिव्हा लुली पडते म्हणतात ना-अगदीं तसेंच त्याचेंहि झालें. आनंदाच्या ऊर्मीवर ऊर्मी त्याच्या हृदयांत उसळूं लागल्या. त्याला वाटले आनंदातिरेकानें आपलें अंतःकरण तर एखाद वेळी फुटून जाणार नाहीं ना ? पण, छे-शक्यच नाहीं तें ! शान्ताच्या प्रेमाचा अभेद्य बांध त्या ठिकाणी असतांना—

पण, तसें कांहीं एक झालें नाहीं-तो तेथून उठला-त्याच्या मागोमाग शान्ताहि उठली. एकदां सात पावलें ज्याच्याबरोबर टाकलीं,

त्याच्याच मागें आता जन्मभर जाणें भाग आहे असेंच तिला वाटलें कीं काय कोणास ठाऊक! पण ती कांहीं एक न बोलता त्याच्या मागें जाऊं लागली.

सुधाकरानें माधवची चौकशी केली आणि मग सारेच जण माधवला शोधूं लागले.

माधव! माधव!!

अ? कुठं गेला माधव?

कोणी म्हणूं लागले–" आत्तां इथंच होता कीं–" कोणी म्हणाले, " गेला असेल कुठं तरी कामाला." कोणी म्हणाले, " फारच श्रम नि दगदग पडली त्याला. 'घर पाहावं बाधून नि लग्न पाहावं करून' म्हणतात तें काहीं खोटं नाहीं. सारखा राबत होता गेले चार–आठ दिवस! कुठं कांहीं कमी पडूं दिलं नाहीं–असंच त्याचंहि एकदां लौकरच वाजो म्हणजे झालं!"–पण हे शब्द ऐकायला माधव तिथं नव्हता–नाहीं तर त्याला काय वाटलें असतें कोणास ठाऊक!

सुधाकराच्या मनांत फारच अधीरता उत्पन्न झाली. केव्हां एकदा माधवला भेटेन असें त्याला होऊन गेलें. त्याची ती अधीरता पाहून सारेच लोक गोंधळांत पडले. माधवच्या शोधार्थ सर्वांची धांवपळ सुरू झाली.

* * *

माधव मागील माडींत एका इझी चेअरवर पडून अविरत अश्रुमोचन करीत होता.

प्रिय मित्राच्या मंगल विवाहात अश्रुमोचन?–अमंगलच नव्हे का? दिवाळीचा सण साजरा करतांना चन्द्रज्योति, भुईनळे लावायचे सोडून कधीं कोणी घरालाच आग लावीत असतो का!–

मग माधवला असल्या प्रसंगीं अश्रु ढाळण्याचें कारण काय?

सुधाकर त्याचा जिवलग स्नेही होता ना? त्याच्याच परिश्रमांमुळें सुधाकरचें शान्ताशीं लग्न झालें ना?—तें लग्न झालेलें पाहून त्याला अगदीं कृतकृत्य झाल्यासारखें वाटलें ना?—मग त्याला दुःख कां व्हावें?—त्यानें अश्रुपात कां करावा?

पण, अन्तरींच्या यातना इतराना कशा कळणार?—वडवानलांत सांपडलेल्या हरणाचे आर्त स्वर कोणाला ऐकूं येणार? जिव्हारीं बाण लागलेल्या सशाच्या करुण किंकाळ्या कोणाच्या कानावर पडणार? माधवचेंहि तसेंच होतें. बाह्य जगांत माणसाला अनेक भूमिका पार पाडाव्या लागतात; पण, अंतर्मनाला कोणी कधींच फसवूं शकत नाहीं—त्याचा कोंडमारा कोणालाहि करतां येत नाहीं. सुधाकराचा विवाह शान्ताशीं झाला याबद्दल त्याला कृतार्थता वाटली, काहींसें समाधानहि वाटलें असेल—पण, हृदयाची तळमळ, अन्तरींच्या यातना मात्र अधिक वाढल्या आणि म्हणूनच असल्या मंगल प्रसंगीं त्याच्या नेत्रातून अश्रु वाहूं लागले. मनुष्य शारीरिक कष्ट, परिश्रम, दुःख, यातना सहन करूं शकतो; पण, मानसिक यातना—त्यातूनहि प्रेमभंगाच्या यातना—यमयातनापेक्षाहि कठोर असतात!

उकळत्या पाण्याच्या भाड्यावर झाकण ठेवलें म्हणून का कुठें त्या उकळ्या थांबणार आहेत? इतका वेळ बाह्य औपचारिक गोष्टींत मन व्यग्र झालें असलें तरी मनावरील तें दडपण बाजूला सरतांच—सुधाकर—शान्ताच्या मस्तकीं मंगलाक्षता पडताच—माधवच्या हृदयाचे बाध फुटले आणि भावनाचे बाध फुटल्यानंतर अश्रूंचेहि पाट त्याच्या मागोमाग धांव घेऊं लागले!

माधवचा शोध करीत सुधाकर त्या ठिकाणीं आला. दाराला त्यानें धक्का दिला. तें आतून लावलें होतें. त्यानें हाक मारली—
"माधव!"

त्या हांकेसरशीं माधव खूपच मोठयानें दचकला. निबिड अरण्यांत वाट चुकल्यामुळें गांगरून गेलेल्या प्रवाशास अगदीं ओळखीची जरी एखादी हांक ऐकूं आली, तरी देखील त्याला असेंच दचकायला होत असेल. सुधाकराची हाक ऐकून माधवहि असाच दचकला. त्यानें चटकन् आपले डोळे पुसले व घाईघाईनें दाराची कडी काढली.

सुधा—शान्ता त्याच्यासमोर उभीं होतीं.

त्यांना पाहताच माधवनें मुखावर शक्य तितकें हास्य आणलें. पण तें हास्य घनदाट काळोखांत एखादा काजवा चमकावा तद्वतच भासत होतें! त्या हास्यांत आनंदापेक्षा आर्तताच अधिक होती. त्या हास्याच्या पडद्यामागें भावनांचें कलेवर पडलें होतें. प्रेतावर फुलाची रास उभी करून तें सजविलें, तरी जागत्या मूर्तीची सजीवता थोडीच त्यात दिसणार?

" अरे, होतास कुठं नि इथं काय करतोयस ? "

" काहीं नाहीं—सहज बसलों होतों. "

पण त्याच्या उत्तराकडे लक्ष न देतां सुधाकर अगदीं त्याच्याजवळ गेला व त्याचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन म्हणाला, " माधव, आम्ही तुझा आशीर्वाद मागायला आलों आहोंत ! "

सुधाच्या प्रत्येक शब्दांत कृतज्ञता भरली होती. त्याच्या कातर स्वरात त्याच्या मनाचे भाव पुरेपूर उमटले होते.

माधवला नमस्कार करण्यासाठीं तो खालीं वांकला.

माधवला अगदीं गहिंवरून आलें. त्याचे डोळे आनंदानें व अभिमानाने भरून आले. खालीं वांकलेल्या सुधाकराला त्यानें तात्काळ वर उठविलें आणि त्याला कडकडून प्रेमालिंगन दिलें.

तें दृश्य भरतभेटीची आठवण करून देणारेंच होतें.

शान्ताहि त्याला नमस्कार करण्यासाठीं पुढें झाली.

त्या चार नेत्रांचें मीलन झालें–त्यांत त्यांना काय दिसलें असावें ? कुठल्याशा जादूच्या कांचेच्या गोळ्यांतून म्हणे, आपणाला इच्छित अशा सर्व वस्तू दिसूं शकतात–त्यांनाहि त्या चार नेत्रांतून असेंच कांहीं तरी इच्छित, दिव्य, पवित्र, सोज्वल स्वरूप दिसलें असेल का ?–कीं, त्यांत आणखी कांहीं भेसूर दृश्य दिसलें असावें ?–पण भाल्याची फेंक होऊन हृदयें विदीर्ण व्हावींत असेंच कांहींसें त्यांना त्या वेळीं वाटलें !

दोघानाहि काय सागावयाचें होतें तें त्यांनीं त्या चार नेत्रांच्या मध्यस्थीनें सांगितलें. मुक्यानेंच सारी भाषा झाली. अंतरींच्या यातना अंतरींच उमगत असतात.

शान्तानें लवून त्याला नमस्कार केला. त्याच वेळीं तिच्या नेत्रां-तले दोन उष्ण थेंब त्याच्या पायावर पडले. त्याचा भास होतांच माधवच्या हृदयात जबरदस्त चरका बसला. तिचे ते अश्रु त्याला तप्त लोहरसाप्रमाणें वाटले कीं, कोमल अशा पुष्पाप्रमाणें वाटले कोणाला ठाऊक ! मात्र माधवचे नेत्र म्हणत होते :

‘शान्ता, हे तुझे स्वर्गाच्या मोलाचे, कुबेराच्या संपत्तीलाहि कवडीमोल ठरविणारे अश्रु असे मातीमोलानें का सांडतेस ?’ त्यावर तिच्या नेत्रांनीं उत्तर दिलें—

‘नाहीं माधव, माझे हे अश्रु मातीला मिळत नाहींत, तर तुझ्या चरणकमलावर पडून ते आज परम पावन झाले आहेत !’

“माधव, मी आशीर्वाद मागायला आलें आहें—मला तुमचा आशीर्वाद हवा आहे.”

शान्ताचे ते शब्द माधवचें काळीज चिरून आंत घुसले. सुधाकर जर तिथें नसता, तर त्यानें शान्ताच्या कुशींत शिरून मनसोक्त रडून घेतलें असतें.

शान्ताला आशीर्वाद द्यायचा!—कसला आशीर्वाद द्यायचा? माझ्या हतभाग्याचा आशीर्वाद शापहि ठरायचा एखाद वेळीं!

माधवला कांहींच सुचेना—तोहि किंचित् वांकला; त्याच वेळीं त्याच्या नेत्रांतील अश्रु तिच्या मस्तकावर पडले. त्यांचा भास शान्ताला स्पष्टपणें समजला. तिला त्याहि अवस्थेंत कमालीचा हर्ष झाला. प्रत्यक्ष साऱ्या देव—देवतांनीं जरी स्वर्गांतून पुष्पवृष्टि केली असती, तरी तिला जो आनंद झाला नसता, त्याहून शतपटीनें अधिक आनंद—माधवच्या अश्रुपातानें तिला झाला. अति दुःखाच्या प्रसंगीं एखाद्या दुःखद घटनेंत माणसाला आनंदाचा किरण सापडूं शकतो. शांताला त्या अश्रूंचा पुरेपूर अर्थ समजला. प्रेमाच्या साम्राज्यांत आशीर्वादाची रीत याहून दुसरी कोणती चांगली असणें शक्य आहे?

  

शान्ता!

माधवनें ज्या वेळीं प्रथमतःच शान्ताला पाहिलें, त्या वेळीं त्याच्या हृदयांत कसलीशी वीज चमकून गेली आणि क्षणार्धांत ती सर्वांगांत भिनली! शांताचा शांत आणि सुशील स्वभाव, मोहक मुखावरील आकर्षक भाव, लाडिक आणि गोड वर्तन, विशेषतः तिच्या नेत्रांतील ते करुण—कोमल भाव या सर्वांमुळेच माधवची प्रथमदर्शनींच मनोवृत्ति चलविचलित झाली; त्याच्या हृदयाची ओढ पहिल्याच दृष्टिभेटींत तिच्याकडे लागली; तिच्या दर्शनाविना त्याचा एकहि दिवस सुना जाईनासा झाला.

शांताचा थोरला भाऊ रघुनाथ हा माधवचा वर्गमित्र. त्यांच्या या ओळखीमुळेंच माधवची शांताशीं प्रथमतः ओळख झाली होती. पण ही ओळख होण्यास त्यांना किती तरी वाट पाहावी लागली होती. किती तरी मनाचा कोंडमारा सहन करावा लागला होता. माधव रघुनाथकडे म्हणून जाई; परंतु त्याचें सारें लक्ष शान्ताच्या

खोलीकडे, तिच्या हालचालींकडे असावयाचें ! एखाद दिवस ती त्याला दिसली नाहीं, अगर तिचें अस्तित्व जाणवलें नाहीं, म्हणजे त्याच्या जिवाची घालमेल व्हायची-हवेंत खूपच उष्मा वाढल्यासारखें त्याला वाटायचें. अशा वेळीं तो म्हणायचा-' आज फारच उकडतंय, नाहीं ? ' त्यावर त्याला उत्तर मिळायचें-' वा ! डिसेंबरचा महिना आहे-मे नाहीं; बाहेर काय सुंदर हवा पडलीय् ! '

' बाहेर पडली असेल सुंदर हवा; पण माझ्या हृदयात मात्र ज्वालामुखी भडकला आहे ! ' अशाच तऱ्हेचे काहीं तरी उत्तर देण्याचा त्याला मोह व्हावयाचा-पण तो तसाच आवरत असे.

माधव रघुनाथच्या घरीं नेहमीं जाई. त्याच्याशीं अभ्यासासंबंधीं व इतरहि विषयांवर तासन् तास बोलत राही. शान्ताशींहि अनेकदां दृष्टिभेटी होत असत. पण, घरातील जुन्या वळणाचे शालीन संस्कार म्हणा अथवा शान्ताचा लाजरा स्वभाव म्हणा, पण अद्यापपर्यंत त्याची प्रत्यक्ष ओळख झाली नव्हती; मग परिचय कुठला नि संभाषण कुठलें !

पण, तरुण मनाला कोणी ओळख करून द्यावी लागत नाहीं; परिचय वाढविण्यासाठीं कृत्रिम प्रयास करावे लागत नाहींत. हृत्संदेश आपले काम चोख रीतीनें बजवीत असतात. नेत्राच्या लेन्समधून घेतलेले फोटोग्राफ्स हृदयाच्या बॅकग्राउंडवर बरोबर उमटत असतात. वाऱ्यानें उडालेल्या नि रानात जाऊन पडलेल्या बीजाला कोणी खतपाणी घालावें लागत नाहीं. निसर्ग आपलें कार्य करीत असतो. प्रेमाच्या बीजाचेहि तसेंच असतें. शान्ता-माधवच्या प्रेमाचें बीज त्यांच्या नकळत रुजलें गेलें होतें. मात्र त्यांना अद्यापि अंकुर फुटले नव्हते. त्यांच्या मुग्ध प्रेमाची भाषा नेत्रांच्या मध्यस्थीनें चालली होती-पण, तीच भाषा वाचेनें बोलावी-अंतःकरणाची

कवाडें खोलावींत असें त्याना खूप खूप वाटे. त्यासाठीं ते दोन जीव अगदीं आतुर झाले होते.

—पण, हे असें किती दिवस चालणार? निसर्गाचा अंमल बाह्यसृष्टीवर चालत असतो, त्याप्रमाणें तो मनावरहि चालतो.

माधवला वाटायचे—

शान्ताशीं आपणाला कधींच का बोलायला मिळणार नाहीं?—

शान्ताला वाटायचे—

—काय वाटायचें कोणाला ठाऊक! पण काहीं तरी वाटायचें हें मात्र खास!

तपश्चर्या ऋषिमुनींच्याच फळाला याव्यात, आणि तरुण प्रेमिकाच्या येऊं नयेत असे थोडेंच आहे!

त्याप्रमाणें एके दिवशीं माधवचीहि तपश्चर्या फळाला आली; त्याची हृदय—देवता त्याला प्रसन्न झाली; पण या देवतेने " वर माग " असा कौल दिला नाहीं. तर—

त्याचें असे झालें—

नेहमींप्रमाणे माधव रघुनाथकडे गेला होता—म्हणजेच शान्ताचें दर्शन व्हावे यासाठीं त्याच्याकडे गेला होता; पण तो त्याच वेळीं कुठें तरी बाहेर गेला होता. घरांत त्याची आई स्वयंपाक करण्यात गुंतली होती. वडील असेच कुठें तरी कामानिमित्त बाहेर गेले होते. शान्ता मात्र दिवाणखान्यात अभ्यास करीत बसली होती.

माधव दिवाणखान्यात आला. रघुनाथ त्याला कुठेच दिसला नाहीं—पण त्याला हवें असलेलें माणूस मात्र तिथें बसलेलें आढळलें. त्याला हवें होतें तें मिळालें.

शांताशीं बोलण्याची मोठीच संधि प्राप्त झाली होती.

पण, तिच्याशीं बोलण्याचें धैर्य मात्र त्याला झालें नाहीं.

त्यानें ओळखलें कीं, रघुनाथ घरीं नसावा—

आणि त्याला असेंहि वाटलें कीं, रघुनाथ घरीं नाहीं हें दिसत असतांहि 'तो घरीं आहे का ?' असें शाताला विचारणे म्हणजे शिष्टाचाराचा भंग करणे आहे. पण, आपण काहींच न बोलतां निघून गेलों तर तोहि एक प्रकरचा शिष्टाचाराचा भंगच नाहीं का ?

आणि म्हणून त्यानं बोलण्यासाठीं जिभेची कांहीं तरी चाळवाचाळव केली. पण ते शब्द ओठाची सीमा ओलाडू शकले नाहींत.

तो आल्या पावलीं तसाच माघारीं जायला निघाला.

इकडे शान्ताची स्थितिहि मोठीच चमत्कारिक झाली होती. माधवला समोर पाहताच तिच्या मनाचा खूपच गोड गोंधळ उडाला होता. माधवऐवजीं दुसरें कोणी असतें, तर आपण इतकें काहीं बावरलों नसतो असें तिला एकदा वाटले, आणि मग आता आपण काय केले पाहिजे हाहि विचार तिच्या मनात लागलीच येऊन गेला. माधवशीं आपण बोलले पाहिजे का, आणि न बोललों तर ?-शिष्टाचाराला सोडून नाहीं का होणार ते ?-शिवाय तेवढ्यावरूनच माधवने आपला अपमान झाला अशी काहीं तरी कल्पना करून घेतली तर ? त्याचा गैरसमज मग कोण काढील ?—आणि मग तिच्या मनाचा अधिकच गोंधळ उडाल्यासारखे झालें.

त्या अवस्थेत असल्यामुळें ती काहींच बोलली नाहीं. माधव आतां दारापर्यंत जाऊन पोंचला होता. शान्ताचा ऊर जोरजोराने धडधडत होता. तिला कोठून अवसान आलें कोणास ठाऊक —

"दादा बाहेर गेलाय्; पण येईलच इतक्यात !" शान्ताच्या तोंडून शब्द बाहेर पडले.

माधव जागच्या जागींच थबकला !

आणि मग तो का थबकला हे शाताच्या काहीच लक्षांत आलें नाहीं.

कारण, आपण काय बोललों हें आपल्या हृदयाच्या धडधडीमुळें आपणाला कांहींच ऐकायला आलें नाहीं, असें तिला वाटलें.

माधव काहीं एक न बोलता एका खुर्चीवर जाऊन बसला.

शान्तानें म्हटलें होतें कीं, रघुनाथ आता इतक्यातच येईल म्हणून— पण, कदाचित् त्याला उशीर झाला तर ?

तर मग आपणाला आजचीं हीं गणितें कोण समजाऊन देईल ? आणि हीं गणितं आज शाळेंत करून तर वेळींच गेलं पाहिजे !—

आणि मग तिला फारच अस्वस्थता वाटूं लागली.

तिला वाटले—

तिला काय वाटलें ते तिने चटकन् बोलून दाखविलें—

" एवढी आलजिब्र्याचीं गणितं देता का समजाऊन ? "

माधवला भास झाला कीं—कुठें तरी आकाशवाणी झाली म्हणून !

त्यानें भोवतालीं पाहिलें—

शान्ता त्याच्याकडे चोरट्या नजरेनें पहात होती.

माधवाने तिच्या हातातील आल्जिब्रा घेतला आणि त्याच वेळीं—

तिच्या बोटाचा त्याच्या बोटाना स्पर्श झाला. त्या प्रथमस्पर्शानें जें कांहीं व्हायचें तेंच झाले ! आणि मग शान्ताला वाटले—

—कीं—माधवराव कित्ती कित्ती चागले आहेत ! कसे अगदीं एखाद्या कसलेल्या मास्तराप्रमाणे—इश्श !—मास्तराप्रमाणे नाहीं काहीं—अगदीं एखाद्या प्रोफेसराप्रमाणें गणितं समजावून देतात !

आणि हे विचार मनात आले त्या वेळीं का कोण जाणे, पण तिच्या गालांवर खूपच लाली चढली नि तिचा ऊर अधिकच धडधडू लागला. आजपर्यंत ज्या गणिताचा ती द्वेष करीत होती, त्याचे ती आता मनांतल्या मनात आभार मानूं लागली.

अन् मग त्यानंतर तीं दोघें आयुष्याचीं गणिते सोडविण्याचा प्रयत्न करूं लागलीं. त्याच वेळीं त्याना आढळून आलें कीं, पुस्तकांतलीं कठीण गणिते सोडविणेहि पुष्कळदां सोपें असतें; पण आयुष्यातलीं गणितें फारच कठीण असतात. काहीं कांहीं वेळां तीं

मुळींच सुटत नाहींत. त्यातून प्रेमाच्या गणितांनीं तर त्यांना एक नवीनच सृष्टि दिसली. त्याना आढळून आलें कीं, प्रेमाच्या अंकगणितात वजाबाक्या कधींच नसतात; त्यात फक्त बेरजा नि गुणाकारच असतात. हें असें का याचें कोडें मात्र त्यांना सुटलें नाहीं. तें सोडविण्याची 'किल्ली' किंवा 'वाटाड्या' त्यांना कुठल्याहि पुस्तकाच्या दुकानात नि ग्रंथालयात सापडला नाहीं. आणि मग शेवटीं त्यांनीं आपल्या हृदयाचींच कपाटें शोधून पाहिलीं. अन् मग त्याना तो 'वाटाड्या' सांपडला; पण, त्यामुळें तीं दोघें अधिकच गोंधळलीं, कारण त्यात त्यांना प्रेमाच्या गणिताची 'रीत' सांपडली होती; पण त्याचे उत्तर त्यांना हवें होतें तें मिळूं शकलें नाहीं. तें उत्तर त्याना मोठे चमत्कारिक वाटलें. कारण, त्यांनीं कल्पनाहि केली नव्हती कीं, अशा तऱ्हेच्या समाजांतील रूढीचे आणि जातिभेदाचे हातचे धरावे लागत असतात. आणि ते हातचे धरले म्हणजे त्याना त्याच्या प्रेमाचें उत्तर 'शून्य' मिळत होते. त्यांना वाटूं लागले त्याहून एखादी निराळी 'रीत' नाही का प्रेमाचं गणित सोडवायला ?

सामाजिक रूढी—जातिभेद—प्रेम !

कधींच का या तिघाचे ऐक्य होणार नाहीं ?

याच्या ऐक्यासाठीं तरुण मनाचे आणखी किती बळी पडणार आहेत ?

याचे ऐक्य होत नाहीं म्हणून जीवनाचा डाव कुजत का ठेवायचा ?

सामाजिक चालीरीती नि जातिभेद याचें ऐक्य होत नाही म्हणून तरुण युग्माचे बळी का देत बसायचे ?

जातिभेदाचीं बंधनें म्हणजे—क्षितिजाचीं बंधनें नव्हेत ! ती तोडलींच पाहिजेत.

माधव नि शान्ता–दोघेंहि सुशिक्षित होतीं–स्वतंत्र विचाराचीं होतीं; त्याना हीं सामाजिक कृत्रिम बंधनें मान्य नव्हतीं. बंडाचा झेंडा उभारून क्रांति घडवून आणावयाची, असेंच त्यांनीं ठराविलें.

पण —

नियती दुसरेच डाव खेळत होती !

त्याच सुमाराला माधवचा एक बालमित्र सुधाकर इंग्लंडहून उच्च पदवी घेऊन आला होता.

योगायोगाने जगात अनेक घटना घडत असतात. अशाच योगायोगाने शांता–सुधाची ओळख झाली.

या ओळखीला माधवच कारणीभूत झाला होता.

सुधाकर आणि माधव एकाच झऱ्यातून निघालेले दोन प्रवाह ! शरीरें दोन–पण, मन मात्र एकच !

त्यांचें अकृत्रिम प्रेम पाहून शांतालाहि कधीं कधीं मत्सर वाटे; पण, तो फार वेळ टिकत नसे.

सुधाकरचा स्वभाव, गुण, आवडीनिवडी साऱ्या काहीं माधवासारख्याच होत्या. अर्थात् शांताला सुधाकर आवडत असे. त्याच्याशींहि ती मनमोकळेपणानें बोले, हंसे, खेळे, फिरावयास जाई.

पण, शांताच्या या मोकळेपणामुळेच सुधाकराच्या सुप्त भावना जागृत झाल्या. नकळत त्याचें तिच्यावर प्रेम बसत चाललें. त्याला माहित नव्हते कीं, माधवाचें तिच्यावर प्रेम होतें आणि शांताहि माधवावर अनुरक्त होती. त्याच्यातील जातिबंधनामुळेंच सुधाच्या मनाला तो प्रश्न कधींच शिवला नाहीं. इंग्लंडात राहिल्यामुळें बौद्धिक प्रेमाची त्याला माहिती झाली होती आणि तशाच प्रकारचें त्या दोघाचे प्रेम असेल असें तो समजून चालला होता.

सुधाचा प्रेमवृक्ष अशा प्रकारे फोफावत होता. माधवला त्याची कल्पना नव्हती–शान्तालाहि नव्हती !

एके दिवशीं सुधाकरानें शान्ताऐवजीं प्रथम माधवपुढेंच आपलें अन्तःकरण खुलें केलें.

माधवच्या मनाला मनस्वी धक्का बसला.

शान्तावरील आत्यंतिक प्रेमामुळे सुधाकर वेडा झाला आहे हें माधवला समजून चुकलें; आणि त्याबरोबर त्याला हेंहि समजून चुकले कीं, शान्ताच्या नि आपल्या विवाहाच्या मार्गात जितके अडथळे आहेत तितके शान्ताच्या नि सुधाच्या लग्नात नाहींत. त्याच्या मार्गात जातिभेदाची धोंड नाहीं. शिवाय सधा इंग्लंड-रिटर्न्ड आहे !

एका भावाच्या हातून दुसऱ्या भावाचा वध होण्याचा प्रसंग निर्माण व्हावा-ही दैवगति कीं, जगाची नियति ?

माधवचें मन सुन्न झाले-हृदय बधिर झालें !

मित्रप्रेम कीं प्रेयसी-प्रेम ?

कोणाचा त्याग करावयाचा नि कोणाचा स्वीकार करायचा ?—

माधव—

तोहि एक मानवी प्राणीच होता, तरुण होता. ज्या प्रेमाची त्यानें आजपर्यंत जोपासना केली, ज्या भावना त्यानें जिवापाड जतन करून ठेवल्या, त्याचा आपल्याच हातानें खून करावयाचा ?-त्याचें एक मन म्हणत होते-मित्र असला म्हणून काय झालें ? माझ्या प्रियतमेवर प्रेम करायचा त्याला काय अधिकार ? अन् मी तरी काय म्हणून त्याच्यासाठीं माझ्या प्रेमाचा त्याग करायचा ? मित्र काय-एक नाहीं हजार मिळतील-पण प्रियतमा-प्रेम-एकदाच करायचें असते ! छट्! तें काहीं नाहीं ! शांताच्या प्रेमापुढे मी मित्रप्रेम जाणत नाहीं-पण, दुसरें मन त्याला लागलीच म्हणे : वेडा आहेस तूं-सुधाकराला काय माहित कीं, तुझे शातावर प्रेम आहे म्हणून एखाद्या फुलपांखराला अमुक एका फुलावर बसूं नकोस अस

कसं म्हणतां येईल ? आणि समजा, सुधाला तें माहित असतं–तरी प्रेमाला बंधन कोण घालूं शकणार ?-माझ्याइतकंच सुधाचं शांतावर प्रेम आहे. स्वार्थाला बळी पडून मीं जर शान्ताची अभिलाषा धरली, तर सुधाला काय वाटेल? त्याच्या मनाची अवस्था काय होईल ? शिवाय जातीनं ती त्याला जितकी जवळ आहे, तितकी मला आहे का ? सुधाची फसवणूक केली तरी शांताचे आई–वडील नि प्रत्यक्ष तिचा भाऊ–आपला स्नेही हा तरी आपल्या विवाहाला कधीं संमति देईल का ? प्रेमाचं गणित सोडवताना हे हातचे वेगळून कसं चालेल ?

पण शान्ताला काय वाटेल? मी तिचा विश्वासघात केला असंच नाहीं का तिला वाटणार ?

माधवाला अगदीं वेड लागण्याची पाळी आली. त्यानें खूप खूप विचार केला त्याचा. त्याला कांहींच मार्ग सापडला नाहीं ! आणि मग शेवटीं व्हायचें तेंच झालें !

शान्ता-सुधाच्या विवाहांत त्यालाच पुढाकार घ्यावा लागला—

प्रेमाच्या होमकुंडात त्यानें आपला स्वतःचा बळी दिला आणि त्याच होमकुंडांतील अग्नीला साक्ष ठेवून शान्ता-सुधानें शपथा घेतल्या.

त्या होमकुंडात तो ज्या आहुति देत होता त्यांतच शान्ता–माधवच्या भग्न प्रेमाच्या आहुतीहि आपण देत आहोंत याची सुधाला कल्पनाहि नव्हती. त्यानें जर शान्ता–माधवकडे नीट निरखून पाहिले असतें, तर त्याला त्या होमकुंडांतदेखील त्यांच्या भावना धडधड जळत असलेल्या दिसल्या असत्या !

---

# दोन पिढ्यांतील अन्तर

शहाण्यानीं टेबलावरचे कागद उचलले, कोट नीट सांवरला शर्टाचें वरचें बटन लावलें आणि शेजारच्याच संपादकाच्या खोली कडे ते वळले.

संपादकाच्या खोलीचें दार त्यानीं हळूच उघडलें आणि आत प्रवेश केला. संपादकांनीं हातांतील वर्तमानपत्रांतून डोकें वर काढलें आणि जाड भिंगाच्या चष्म्यातून त्यांनीं शहाण्यांकडे पाहिल्यासारखे केलें व पुन्हा तोंड वर्तमानपत्रांत खुपसलें.

शहाण्यांनीं आवंढा गिळला व भीत भीत म्हटलें,

“श्री. किरकिऱ्याची गोष्ट मीं वाचून पाहिली; पण ती चांगली नाहीं.”

“च्! च्! काय झालंय् तिला?” संपादकानीं हातांतील वर्तमानपत्र एकदम खालीं फेकीत व खुर्चीवर नीट सांवरून बसत किंचित् रोषानें व त्रस्तपणानें विचारले, “काय वाईट आहे त्या गोष्टींत?”

" सर्व काहीं. तिच्यात वास्तवता नाहीं, सुसंगति नाहीं, नाट्यात्मता नाहीं, कीं ध्येयनिष्ठाहि नाहीं. अवडंबरच फार माजवलं आहे. प्रसंगनिर्मितीहि फारशी नाहीं; शिवाय कथानक देखील अगदीं गचाळ आहे; लेखनपद्धति जुनाट वाटते, आणि लेखकाला जीवनाची कांहीं जाणीव असावी असंहि वाटत नाहीं. "

संपादकाच्या कपाळावर आठ्याचे जाळे अधिकच पसरले. त्यानीं आपल्या टक्कल पडलेल्या डोक्यावरून हात फिरवीत शहाण्यांना विचारले,

" तुमचं वय किती आहे, शहाणे ? "

" चोवीस. "

" अन् किरकिऱ्यांची आज साठी उलटून गेली आहे म्हटलं ! मी शाळेत असल्यापासून नि तुमचा जन्म होण्याच्या आधींपासून किरकिरे लघुकथा लिहीत आहेत हें माहित आहे का तुम्हाला ? हरिभाऊंनीं काढलेल्या "करमणूक" मासिकाच्या पहिल्या अंकात किरकिऱ्याची गोष्ट प्रसिद्ध झाली आहे हें तुम्हाला कसं माहित असणार ? तुमचा जन्महि झाला नव्हता त्या वेळीं; अन् त्यावेळपासून किरकिऱ्याच्या गोष्टीशिवाय करमणूक, मनोरंजन, नवयुग या मासिकांचा एक अंक निघाला नाहीं. अन् तुम्ही मला शिकवताकीं त्याच्या गोष्टींत जीव नाहीं म्हणून ! "

" त्या वेळचा काळ निराळा होता. आता—" शहाण्यानीं बोलण्याचें धाडस केले; पण त्याना अडवून संपादकमहाशय उद्गारले,

" म्हणून काय झालं ? किरकिऱ्याच्या गोष्टींनीं महाराष्ट्राला एके काळीं वेड लावलं होतं. अन् त्यांच्या गोष्टींना तुमच्यासारख्या अजाण पोरानं नांवं ठेवावींत ? तुमच्यासारख्यानीं त्याच्या पायापाशीं बसून धडे घ्यावेत इतकी त्याची योग्यता आणि तपस्या थोर आहे, समजलात ? सहसंपादकाच्या खुर्चीवर बसलांत म्हणन काहीं तम्हाला

त्याच्या थोरपणाला खालीं ओढण्याचा अधिकार मिळालेला नाहीं."

शहाणे क्षणभर स्तब्ध राहिले. त्यांच्या मनांत मोठीच खळबळ उडाली असावी असें त्याच्या चर्येवरून अगदीं स्पष्ट दिसत होतें. ते अगदीं तरुण होते. कॉलेजांतून पदवी घेऊन ते नुक्तेच बाहेर आले होते. अगदीं हुशार व चलाख, शिवाय गाढ व्यासंगी नि अभ्यासू म्हणून त्याना "दिवाकर" मासिकासारख्या महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाच्या मासिकावर सहसंपादकाची जागा मिळाली होती. त्याचे वाचन अद्यावत् होतें. पुरोगामी विचारसरणीचे नि वाचकाना काहीं तरी नवीन खळबळ उडविणारे नि विचारप्रवर्तक वाङ्मय पुरवावें या विचारसरणीचे ते होते. अर्थात् श्री. किरकिऱ्यासारख्या एका जुन्या व कसलेल्या कथालेखकाची लघुकथा जुनाट वळणाची व प्रतिगामी स्वरूपाची म्हणून त्यानीं तिच्याबद्दल नापसंती व्यक्त करावी हें साहजिकच होतें; पण "दिवाकर" मासिकाचे संपादक श्री. सहस्रबुद्धे हे मधल्या पिढीचे असल्याकारणानें व साधारणतः त्याचा कल जुन्या वाङ्मयाकडेच असल्याकारणानें त्याना शहाण्याची विचारसरणी पटूं नये यात नवल काहींच नव्हतें. पण असें असलें, तरी शहाण्यांची विचारसरणी धुडकावून लावण्याचेंहि त्याच्यात धैर्य नव्हतें. शहाण्याच्या बुद्धिमत्तेचे सामर्थ्य त्याना नाकबूल नव्हते, आणि म्हणूनच त्यांच्याशीं वादविवाद करण्यात त्याना कमीपणाहि वाटत नसे, किंवा त्यात एखादवेळीं हार खावी लागली, तरी त्याविषयीं त्याना खंतहि वाटत नसे.

आजचाहि प्रसंग असाच होता.

किरकिरे जुन्या पिढींतले खंदे लेखक असतील, त्याच्या लघुकथानीं एकेकाळीं साऱ्या महाराष्ट्राला वेड लावले असेल, प्रत्यक्ष "दिवाकर" मासिकाच्या अभ्युदयालाहि त्याचें लिखाण कारणीभूत झाले असेल; पण, आजची त्याची लघुकथा शहाण्यांच्या दृष्टीनें अद्यावत् नव्हती,

आणि म्हणूनच त्यांनीं तिच्यावर नापसंतीचा शिक्का मारला होता व त्यावरच वाद माजला होता.

शहाण्यांनीं स्वसमर्थनार्थ आजच्या वाचकवर्गाची भूक काय आहे व त्यांना कोणतें खाद्य दिलें पाहिजे ही गोष्ट अतिनम्रतापूर्वक सहस्रबुद्ध्यांना सांगितली. ते म्हणाले—

" किरकिऱ्यांच्या बाबतींत तुमचं म्हणणं एक वेळ खरंहि असूं शकेल; पण आज आपणाला अद्यावत् वाङ्मयाचीच आवश्यकता आहे. माझ्या म्हणण्याचा आशय इतकाच कीं, आपल्या वाचकाना आतां नवीन दृष्टिकोणाच्या लघुकथा हव्या आहेत, त्यांना जुन्या वळणाच्या आणि ' राजा–राणी ' छापाच्या कथा वाचण्याचा आता वीट आला आहे; असं असतांना आपण तशाच तऱ्हेचं प्रतिगामी स्वरूपाचं वाङ्मय त्याच्या गळयांत उतरवण्याचा प्रयत्न करणं म्हणजे आपल्या वाचकवर्गाची वाङ्मयिन भूक दडपून टाकण्यासारखं होणार आहे. यासाठीं मला वाटतं, अशा प्रकारचं वाङ्मय आजचे तरुण लेखकच निर्माण करूं शकतील. ताज्या रक्ताच्या नि पुरोगामी विचारसरणीच्या लेखकांनाच आजच्या वाचकवर्गाची नाडी पुरेपूर समजली आहे. प्रो. फडके काय किंवा खाडेकर काय, यांना तरुणाचीं मनं चागलींच माहित आहेत. आणि म्हणूनच त्याच्या कथा–कादंबऱ्यांवर आजच्या वाचकवर्गाच्या उड्यांवर उड्या पडत आहेत.–"

" पुरे झालं तुमचं हें फडके–खांडेकर पुराण! हें कांहीं "समाजस्वास्थ्या'चं ऑफिस नाहीं. आमचा वाचकवर्ग कोणता आहे आणि त्याला काय हवं हें आम्हाला चागलंच माहित आहे. पुरोगामी वाङ्मयाचा अन् लेखकांचा बडेजाव माझ्यासमोर नको आहे. पांचट आणि शृंगारिक वाङ्मयाची गटारगंगा वाचकांच्या घशांत ओतली म्हणून कांहीं कोणी पुरोगामी लेखक बनत नसतो, समजलांत ?"

" बरं राहिलं. मला जें वाटलं तें सांगितलं. मग काय ? किर-किऱ्यांची गोष्ट पाठवूं ना ' साभार परत ' म्हणून ?—"

" काय—काय म्हणालांत ? किरकिऱ्याची गोष्ट परत पाठवतां ? शुद्धीवर आहात का तुम्ही ?—छट् ! हा किरकिऱ्यांचा अपमान—नव्हे " दिवाकरा"चा हा कमीपणा आहे. राहूं द्या तें हस्तलिखित इथंच; मी स्वतःच वाचून काय तो निर्णय ठरवतों. "

* * *

शहाणे खोलींतून बाहेर पडले व आपल्या टेबलाशीं येऊन त्यांनीं इतर हस्तलिखितें वाचावयास सुरवात केली.

शहाणे निघून जाताच सहस्रबुद्धे ते निघून गेलेल्या दाराकडे शून्य दृष्टीनें पाहातच राहिले. त्यांच्या अंतश्चक्षूंसमोर शहाण्याची अस्पष्ट मूर्ति दिसत होती व कानावर त्याचे शब्द आदळत होते. ' तारुण्य ! तारुण्याचा नि बुद्धिमत्तेचा अहंकार भरला आहे. व्यवहार नि जगाचा अनुभव नाहीं त्याला अजून ! पण, पोरांत कांहीं तरी पाणी आहे खास ! ' सहस्रबुद्ध्यांच्या कानांवर कुठून तरी हे शब्द पडत होते.

शहाण्याबद्दल कधीं कधीं त्यांना मत्सर वाटे. शहाणे जें बोलत तें खरेंच असे. त्याचे विचार त्याना पटत नसत, पण ते नाकारण्याचें धैर्य त्यांना होत नसे. आपलीच विचारसरणी जुनाट आहे, आपण तारुण्याच्या सीमेपलीकडे पुष्कळ मजल मारली आहे. एके काळीं आपण तरुण असलों आणि तरुणाचीं मनें काय असतात हें आपणाला माहित असलें, तरी आजच्या तरुणांचीं मनें आपणाला कुठें माहित आहेत ? एवढ्या कालावधींत त्यांची भूक, त्याच्या आशा—आकांक्षा कांहींच का वाढल्या नसतील ! शिवाय—शिवाय हरिभाऊ—पूर्वकालीन वाङ्मय नि हरिभाऊंच्या काळातील आपण वाचलेले वाङ्मय यात देखील जमीन अस्मानाची तफावत नव्हतीच का ?—मग आपणाला

तरी हरिभाऊ–पूर्वकालीन वाङ्मय कुठें आवडत होतें ? आपण देखील आपल्या काळातील वाङ्मयाची तरफदारी करीत नव्हतों का ? मग शहाण्यांनीं देखील 'आजच्या' वाङ्मयाची तरफदारी केली म्हणून आपण इतकें अस्वस्थ का व्हावें ?–किरकिऱ्याची गोष्ट त्यानीं नापसंत केली म्हणून ? हेंच आपल्या अस्वास्थ्याचं एकमेव कारण असूं शकेल का ? कीं दुसरें काहीं आहे ?–पण छे, पुरोगामी वाङ्मय म्हणजे कांहीं पाचट नि शृंगारिक वाङ्मय नव्हे ! हे पुरोगामी वाङ्मय कसलें–हें समाजाचें शील बिघडवणारें अधोगामी वाङ्मय आहे. शहाण्याना काहींच कळत नाहीं. वारं प्यालेल्या वासराप्रमाणें त्याची ती विचारसरणी आहे झालें ! अविचार आहे हा नुसता ! त्यांना अजून चार ओळी नीटशा लिहिता येत नाहींत. फ्राइड, इब्सेन नि शॉ याचा आधार घेतल्याखेरीज त्याना बोलता येत नाहीं. जगाचा अनुभव तरी काय आहे तसा त्याना ? त्यांच्याकडून अक्कल घेण्याइतके काहीं अजून आम्ही बेअकली झालों नाहीं; सपाट जमिनीवरची मऊ लुसलुशित हिरवळ दिसायला गोजिरवाणी दिसत असली, तरी वृक्षाचा भव्यपणा कांहीं तींत नसतो.

—पण तें काहीं जरी असले, तरी खरोखरच जर का शहाणे म्हणतात त्याप्रमाणे किरकिऱ्यांची गोष्ट अगदींच सामान्य नि जुनाट वळणाची असली तर ?–पण शक्य तरी आहे का हें ? किती झालें तरी किरकिरे हे खंदे लेखक आहेत. सूर्य मावळला तरी काहीं लागलीच काळोख पडत नसतो. तसेंच त्याच्या प्रतिभेचेहि असूं शकेल. पण, आतां मेंदूला अधिक ताण देण्यांत काहींच अर्थ नाहीं. किरकिऱ्याची गोष्ट आपण स्वतः वाचून शहाण्याच्या शहाणपणाची गुर्मी चागलीच उतरावयाची; त्याशिवाय आपणाला समाधान वाटणार नाहीं. पण खरोखरच जर का—

त्याच्याच्याने आतां अधिक विचारच करवेना. त्यानीं किर-

किऱ्यांचें हस्तलिखित हातात घेतलें, चष्मा नीट डोळ्यावर बसविला व एकाग्रतेनें ते ती लघुकथा वाचूं लागले. एकदोन परिच्छेद होतात न होतात तोंच त्यांना कसेसेंच वाटूं लागलें; शहाण्यांच्या तोंडावर फेकण्यालायक एकहि वाक्य, एकहि कल्पना किंवा एकहि प्रसंग त्यांना किरकिऱ्यांच्या गोष्टींत सापडेना. त्याच्या चर्येवर निराशेची दाट कृष्ण-छाया पसरली. पण तेवढ्यानेच ते निराश होण्यासारखे नव्हते. त्याचें मन म्हणत होतें, 'एवढ्यानेंच काय झाले आहे—आताच कुठे हा कथेचा प्रारंभ आहे. रंग भरायला अद्यापि पुष्कळच अवकाश आहे!' अशी स्वतःच्या मनाची समजूत करून घेऊन त्यानीं पुढे वाचावयास आरंभ केला. पण छे! उत्तरोत्तर त्यांची निराशाच होत गेली. त्याचे मन किरकिऱ्याच्या गोष्टींत कुठेच रमेना. ते मनात म्हणूं लागले, "ही माझी स्थिति, मग शहाण्याना काय वाटले असेल? कितीहि झालें तरी तें तरुण रक्त आहे. त्याचेच म्हणणें बरोबर आहे तर—"

* * *

शेवटीं शहाण्यांचाच विजय झाला व तो मोठ्या कष्टानें सहस्र-बुद्ध्यांना कबूल करावा लागला. किरकिऱ्यांची प्रतिभा खरोखरच का नष्ट पावली? मोठाच धक्का बसला त्यांच्या मनाला! कोण ही मराठी वाङ्मयाची हानि! पण छे! असें होणे शक्य नाहीं. किरकिऱ्यानीं घाईघाईनें ही गोष्ट लिहिली असेल किंवा त्या वेळीं त्याचें चित्त तरी ठिकाणावर नसेल. त्याशिवाय त्याच्या हातून इतकी भिकार—काय म्हणालो आपण "भिकार?"—सहस्रबुद्ध्याच्या अंगावर शहारेच उभे राहिले! ज्या रत्नाकरातून माणिक—मोत्ये बाहेर पडलीं, त्याच समुद्रांत गारगोट्याहि असूं शकतात तर?—त्याना कसेसेच वाटूं लागलें. त्यांनीं स्वतःचा पराभव कबूल केला; पण किरकिऱ्याची प्रतिभा नष्ट झाली ही गोष्ट मात्र त्याना मुळींच पटेना!

शहाण्यांच्या म्हणण्याप्रमाणे किरकिऱ्यांची गोष्ट परत करणें

प्राप्तच होतें. आपल्या वाचकांना ती मुळींच आवडणार नाह
याचीहि त्याना पुरेपूर कल्पना आली. क्षणभर त्यांना वाचकांच
मनस्वी संतापहि आला. भारीच चोखंदळ झाले आहेत वाचव
असेंच त्यांना वाटलें; त्यांना गुणांची पारखच नाहीं, पांचट वाङ्म
वाचण्याची त्याना संवय झाली आहे, त्याची दृष्टीच बिघडल
आहे आणि सरतेशेवटीं समाज अधोगतीला जात आहे व त्याल
कारण आजचें वाङ्मय व तें प्रसिद्ध करणारीं मासिकें—साप्ताहिं
हींच आहेत असे म्हणून ते सर्वांवरच संतापले.

या अवस्थेतच त्यांनीं शहाण्यांना हाक मारली. आपल्या इच्छे
विरुद्ध किरकिऱ्यांची गोष्ट नाइलाजाने छापावी लागणार असे
शहाण्याना वाटत होतें. पण ' किरकिऱ्यांची गोष्ट परत पाठवा
हे सहस्रबुद्ध्यांचे शब्द ऐकून त्यांना आश्चर्याचा मोठाच धक
बसला व ते त्याच्याकडे क्षणभर स्तिमित नजरेनें पाहूं लागले.

" पाहतां काय असे माझ्याकडे टवकारून ? परत पाठव
म्हणून सांगितलं ना ती गोष्ट ? छापायला कांहीं सांगितली नाहीं !
संपादकांच्या प्रत्येक शब्दात संतप्तपणा, तिरस्कार व उपरोध भरल
होता. तें ऐकून शहाण्यांना समाधान वाटलें—विजयाचे तेज त्यांच्य
चर्येवर चमकून गेलें.

पण ती गोष्टहि सहस्रबुद्ध्यांच्या दृष्टींतून निसटली नाहीं. शह
ण्यांचा विजय त्यांना सहन होत नव्हता. आपला पराभव झाल
तोच खरा ठरला याचा गर्व त्याच्या चर्चेवर उमटला व आपणार
खिजविणारी चमक त्याच्या डोळ्यांत दिसत होती असेंच त्यांन
वाटलें. त्याच्या अंगाचा संतापानें नुसता भडका उडाला; प
स्वतःशीच चरफडण्यापेक्षां ते कांहींच करूं शकत नव्हते. त्या
शहाण्यांचा काहींच दोष नव्हता; दोन पिढ्यांतील तें अंतर होतें
नव्याच्या नवलाईपुढें नि तेजापुढें जुन्याला नामशेषच व्हा

लागणार. स्वयंप्रकाशित तेजस्वी अरुणाच्या उदयानंतर परप्रकाशित चंद्राला काळोखांत दडी मारावी लागते हें निसर्गसिद्ध सत्य आहे.

सहस्रबुद्ध्यांनीं दीर्घ श्वास सोडला आणि ते इतर कामाकडे वळले. पण आज त्यांचें लक्ष कुठेंच लागेना. त्याच्या मनाची नुसती तळमळ चालली होती. शहाण्यांचीं मतें खरोखरच का बरोबर आहेत? आणि मग किरकिऱ्यांचें तें जळजळीत जीवन, खडतर अनुभव यांना कांहींच का महत्त्व नाहीं?

तसेंच काहीं केवळ नाहीं. किरकिरेच आतां "पिकलें पान" झाले आहेत; आपल्या तरुण वयात त्यांना ज्या कल्पना सुचत, त्या त्याना या वयात सुचणे शक्य नाहीं; आणि म्हणूनच पूर्वीप्रमाणें त्याना आता सहजस्फूर्त लिखाण करता येणें अशक्य आहे.

सहस्रबुद्धे आतां बरेच शात झाले होते. त्यानीं टेबलाच्या खणांतून लेखनसाहित्य काढलें आणि स्वदस्तुराचें एक पत्र किरकिऱ्यांना लिहिले. अगदीं मित्रत्वाच्या नात्याने नकारात्मक मजकूर लिहिला. त्यांत भरपूर सहानुभूति आणि तळमळ व्यक्त झाली होती. आपली गोष्ट परत आल्याचें पाहून किरकिऱ्याना काय वाटेल—या वयात ती परत आल्याबद्दल त्याच्या मनाला किती यातना होतील याची त्याना चांगलीच कल्पना होती. आणि म्हणूनच आपण ज्या हळुवारपणानें दुःखवट्याचें पत्र लिहितों, त्याच नाजुक भावनेनें सहस्रबुद्ध्यानीं किरकिऱ्यांना पत्र लिहिलें. कारण सहस्रबुद्धे एका नामवंत मासिकाचे संपादक असले, तरी ते प्रथम एक मानवी प्राणी होते!

* * *

सहस्रबुद्ध्याचें पत्र किरकिऱ्यानीं मोठ्या जड अंतःकरणानें वाचले. त्यांच्या लघुकथेच्या हस्तलिखिताचें परत आलेलें बुकपोस्ट त्यानीं तसेंच टेबलावर भिरकावून दिलें, आणि त्यानीं आरामखुर्चीत आपला देह लोटून दिला व शून्यमनस्कतेनें ते कडीपाटाकडे पाहूं लागले.

किरकिऱ्याची देहयष्टि किरकोळच होती. साठी उलटून गेली असल्याकारणानें गालफडें बसलीं होतीं. डोक्याला भलें मोठें टक्कल पडलें होतें. डोळयात मूळचें तेज असावें; पण वयोमानानें म्हणा अथवा आजच्या अनपेक्षित प्रकारामुळें म्हणा, त्यांत औदासीन्याची छटा दिसून येत होती. जगाचा अनुभव या प्राण्यानें खूपच मिळविला असावा; पण सारें जग धुंडूनहि त्याच्या मनाला हवें तें सापडलें नसल्याची निराशा त्याच्या चर्येवर प्रसृत झाली होती. या वेळीं तर त्याच्या मुखावर अनेकविध भाव उमटलेले दिसत होते.

त्याच्या मनांत विचार आला—याच क्षणीं आपणाला मृत्यु आला तर?—आपण काहींच गमावलें नाहीं असें होईल. जीवनांत आपण खूपच कीर्ति मिळविली आहे. सर्वसामान्य लेखकाला मिळणार नाहींत इतके पैसे आपण या लेखनावर मिळविले. आपल्या काळांतील लेखकाच्या अर्थप्राप्तीच्या मानानें आपणाला थोडेसे जास्तच पैसे मिळाले असेहि म्हटल्यास चालेल. आता आपला संसारखर्च आणि इतर व्याप यामुळे आपणाजवळ काहीं शिल्लक उरलीं नाहीं, हा भाग निराळा....

—पण आता ही अर्थप्राप्ति होण्याचीं चिन्हें नष्ट होत चाललीं आहेत. एकाहि प्रकाशकाकडून आता आपले येणे राहिलेलें नाहीं; जीवनातील हा एक गंभीर प्रश्नच निर्माण झाला आहे. संपादकाच्या दृष्टीनें आपल्या लिखाणांत दिवसेंदिवस निर्जीवपणा प्राप्त होत असल्याचें दिसून येऊं लागलें आहे.

पण—शेवटचा एकच आशातंतु होता तोहि आतां तुटला; त्याहि ठिकाणी त्याची दारुण निराशा झाली. त्याना जग शून्यवत् भासूं लागले.

त्याच विषण्ण मनःस्थितींत त्यांनीं सहस्रबुद्ध्यांकडून परत आलेलें हस्तलिखित टेबलावरून उचललें आणि उघडून वाचावयास

प्रारंभ केला. त्याना वाटलें थोडासा फेरफार केला म्हणजे सहस्त्रबुद्ध्याना हीच गोष्ट खात्रीनें आवडेल. कारण काहीं काहीं वेळेला कथानकाची सुरवात अधिक मनोवेधक केली, अगर शेवट थोडासा जास्त परिणामकारक केला, म्हणजे तीच गोष्ट सुंदर वटते असा त्याना अनेकदां अनुभव आला होता; म्हणून त्या दृष्टीनें ते ती गोष्ट वाचूं लागले.

परंतु थोड्याच अवधींत सहस्त्रबुद्ध्याची मित्रत्वाची टीका खरी आहे असें त्याच्या प्रत्ययाला येऊं लागलें. गोष्टींत काहीं तरी उणीव आहे हे त्याना चटकन् पटलें. पण काय ते त्याना सुचेना. ती उणीव त्याना भरून काढतां येईना.

विषय कथात्मक होता, मांडणी यथावत् होती, भाषा ओघवती होती, रचना परिपूर्ण होती आणि शेवटहि चांगला होता; पण असें असूनहि त्यात उणीव होती.

किरकिऱ्यानीं आपली लघुकथा संपूर्ण वाचून काढली; प्रत्येक पान उलटताना त्यांच्या मनाला यातना होत होत्या. त्यात जीवनच नव्हतें. निर्जीव वाटत होतें सारें कथानक. कथालेखकाचें प्रतिबिंब त्याच्या कथानकांत प्रतीत होत असतें असें ते नेहमीं म्हणत असत आणि अगदीं त्याचाच आज त्याना पुरेपूर प्रत्यय आला.

ते आता बरेच अंतर्मुख झाले. तारुण्यातील जोम आता पुनरपि परत आणणें शक्य नाहीं याची त्यांना खात्री झाली. आपलं आजचे लिखाण आपल्या वयाप्रमाणेच निःसत्व, कमकुवत आणि निर्जीव निपजणार हें अगदीं उघडच आहे. त्याना जरा चमत्कारिकच वाटले. आपली एक गोष्ट परत आल्याबरोबर आपल्या मनात असल्या प्रकारचे विचार यावेत याबद्दल त्याना नवल वाटले. आपण लेखनाला प्रारंभ केला त्या वेळीं देखील अशाच आपल्या सर्वच गोष्टी परत आल्याचे त्यांना आठवलें; पण त्या वेळीं आपण

आजच्यासारखे कष्टी झालों नाहीं, याचीहि त्याना स्मृति झाली. त्यावेळीं ते पुन्हां दुसऱ्या गोष्टी लिहीत, त्या परत आल्या तरी पुन्हां नव्या दमानें लिहित आणि संपादकांकडे पाठवीत.

त्या वेळीं त्यांना पूर्णपणे माहित होतें कीं, असा एक काळ येईल कीं, त्या वेळीं आपल्या गोष्टी बाजारात खात्रीनें खपूं शकतील. पण त्यांना आतां असेंच वाटलें कीं, आपली शेवटची गोष्ट मात्र खपणें अशक्य दिसतें! आणि हाच त्या काळांत आणि आजच्या काळांत फरक होता. आज ते हीच गोष्ट दुसरीकडे कुठें पुन्हां पाठवूं शकत नव्हते-किंवा नव्या दमानें दुसऱ्या गोष्टी लिहूं शकत नव्हते. याच ठिकाणीं आपला लेखनविराम आहे याची त्यांना पुरेपूर जाणीव झाली.

पुढें काय? आपल्या लेखनाला खरोखरच का पूर्णविराम द्यायचा? त्याना एकहि नवीन कल्पना सुचेना आणि एखादी सुचलीच असती, तर ते आता ती कागदावर उतरवूं शकले नसते.

स्वतःभोंवतालच्या विचारांनीं त्याच्या मनाला भारीच शीण आला. ते आपल्या जागेवरून उठले आणि त्यानीं आळोखे पिळोखे दिले. मनाला खात बसण्यात काहींच अर्थ नाहीं, अन् यापुढें लिहिण्यांतहि आता कांहीं स्वारस्य राहिलें नाहीं असें त्याना वाटूं लागलें. कुठें तरी बाहेर फिरून यावें असा त्यानीं विचार केला. रस्त्यावरची गजबज पाहून शीणलेलें मन तरतरीत होईल आणि आलेला थकवाहि नाहींसा होईल असें त्यांना वाटले.

* * *

बराच वेळपर्यंत ते उगीचच भटकत होते. या भटकण्यांतच वेळ कसा गेला हेंहि त्यांना समजलें नाहीं. ते शहरांतील एका बाजूच्या रस्त्याकडे वळले. थोडेसें चालून जाताच ते थबकले आणि एका जुन्या पुस्तकाच्या दुकानांत शिरले. पुस्तकांचीं भरगच्च कपाटें पाहून त्यांच्या

मनाला बरेंच समाधान वाटलें. आपण आपल्या जगात आलों असें त्यांना झालें. तीं शेकडों पुस्तकें पाहून त्या पुस्तकांच्या लेखकांपैकीं दिवंगत लेखकांची भुतावळ त्यांच्या नजरेसमोर उभी राहिली. उध्वस्त विजयाचीं शेंकडों प्रतीकें दिसूं लागलीं, हजारों आशा आकांक्षांचा चुराडा झालेला त्याच्या नजरेला पडूं लागला; विस्मृतीच्या काळांत दडलेले लक्षावधि विचार त्या कपाटांतील धूळ खात पडलेल्या पुस्तकांत विखुरल्याचा त्याना भास झाला ! प्रतिभावान लेखकांच्या कलाकृति त्या जुन्या पुस्तकांच्या दुकानांत धूळ खात पडल्या होत्या. चार-सहा आणे टाकतांच त्या मिळणें सुलभ झालें होतें !

पण आपलें एकहि पुस्तक या ढिगाऱ्यात नाहीं हें पाहून त्यांना समाधान वाटलें. आपण अशा प्रकारचीं जाडीं पुस्तकें लिहिण्याच्या भरीस न पडतां केवळ ललितलेखनाचीच कांस धरली हेंच बरें केलें, नाहीं तर आपली देखील हीच गत झाली असती असाहि विचार त्याच्या मनात चटकन् येऊन गेला. पण हाय ! त्यांचा त्या दृश्यावर विश्वासच बसेना. त्यानीं आपले डोळे पुनःपुन्हां चोळून पाहिले. त्यांच्या पुस्तकांच्या काहीं प्रती अगदीं कोपऱ्यांत तशाच धूळ खात पडलेल्या त्यांना आढळल्या !

त्यांचें तें पुस्तक चांगलेंच गाजलें होते. फारच वर्षें झालीं त्या गोष्टीला आतां. त्या पुस्तकाने त्याना पैसा मिळाला नसला, तरी कीर्ति खूपच मिळाली होती. सारें जग त्याच्या लिखाणामुळे वेडें झालें होतें. त्या काळीं दारिद्र्यामुळें उपासमार होत असली, तरी त्याची महत्त्वाकांक्षा दांडगी होती. प्रतिभा सतत जागृत होती. पण ते वैभवाचे दिवस आतां फार-फारच मागें गेले होते. ते दिवस आता पुनः येणें शक्य नव्हते.

त्यानीं त्या पुस्तकांची मागणी केली. दुकानदारानें तीं कपाटातून बाहेर काढलीं व धूळ झाडली व तीं त्यांच्या हातीं दिलीं. त्याच्या

कथासंग्रहाचे ते दोन भाग होते. त्यांनीं ते विकत घेतले. त्यांच्या
ात अनेक भावनाचें आंदोलन उठलें. त्यांनीं पुस्तकाचीं पानें
ेल उघडून पाहिलीं नाहींत. आपणाला या वेळीं पूर्ण एकांत
ेजे असाच एक चमत्कारिक विचार त्याच्या मनात आला.
ारुण्यातील सुखस्वप्नात दंग होण्याची त्याना इच्छा झाली.
घरी येतांच त्यानीं आपल्या खोलीला आतून कडी घातली
िवा लावून बराच वेळपर्यंत ते आपल्या जुन्या गोष्टी वाच-
ात गर्क झाले. रात्रीचे किती वाजले याचेहि त्यांना भान
लें नाहीं. पानामागून पाने भराभर ते वाचून काढूं लागले.
वाचनाचा आनंद त्यानीं जन्मात कधींच उपभोगला नव्हता.
ाणच का या कथा लिहिल्या, याचेहि त्याना आश्चर्य वाटूं
ाले. त्या कथात तर्कवाद कमी असेल, जगाचे अनुभवहि
ातील; पण त्यात तारुण्यातील आडदांड खेळकरपणा खास होता,
ेभेची उंच भरारी होती, जोरानें खळखळत जाणाऱ्या निर्झरा-
ाणें त्यात कथानकाचा ओघहि दांडगा होता. त्यात हृदयाची
ामळ होती. भावनेची खळबळ होती. स्वानुभूति होती.

त्याच्या मनात एक कल्पना आली—

या गोष्टी आपण तीस-पस्तीस वर्षांपूर्वी लिहिल्या आहेत. त्या
ाां कोणाच्याहि लक्षात असणे शक्य नाहीं. त्याच जर पुन्हा
ान काढल्या, आणि संपादकाकडे पुन्हा प्रसिद्धीला पाठविल्या
?—तर काय हरकत आहे त्याला ?

त्याचे त्यांनाच हंसूं आले. जुन्या गोष्टी पुन्हा प्रसिद्ध करणें
ाच्या स्वप्नातहि येणे शक्य नव्हते. ती कल्पनाच करणे अशक्य
. पण, एक गंमत म्हणून करायला काय हरकत आहे ?

* * *

शहाण्यानीं घाईघाईनेंच संपादकांच्या खोलींत प्रवेश केला आणि

म्हटलें—" किरकिऱ्याची एक नवी लघुकथा आली आहे; फार चांगली आहे ती ! "

सहस्रबुद्ध्यांच्या डोळ्यात समाधानाचे तेज चमकले " काय ? काय म्हणालात तुम्हीं ?—फारच चांगली आहे ? "

" होय-खरंच चांगली आहे. मी आतापर्यंत हजारों गोष्टी वाचल्या असतील; पण, माझ्या डोळ्यातून अश्रू काढणारी हीच पहिली लघुकथा आहे. "

" पण तुम्हीच म्हणत होतात ना कीं आजकालच्या वाचकांना हवं असलेल वाङ्मय आजचे तरुणच लिहूं शकतील म्हणून ! "

" माझी ती भूल होती. किरकिऱ्याची ही गोष्ट आजकालच्या कोणाहि पुरोगामी लेखकाच्या गोष्टीपेक्षा सरस आहे. "

सहस्रबुद्ध्याना मनस्वी आनंद झाला. शहाण्यांना आपली चूक कबूल करावी लागली याचेहि त्याना समाधान वाटत होतें. सहस्रबुद्ध्यांकडून आलेले साभार स्वीकाराचे पत्र किरकिऱ्यानीं वाचलें आणि एकंदर परिस्थितीचा विचार मनात आणून ते हंसले. त्यांना दोन पिढ्यांतील अंतर चटकन् कळून चुकलें ! तें तरुणपण आज आपणाजवळ नाही, तो जोम नाहीं, ती प्रतिभा नाहीं—आणि ते लिखाणहि करतां येणे शक्य नाहीं ! तरुण लेखकाचे ते काम आहे. त्यांच्यावरच ते सोपविले पाहिजे. आम्ही आता लेखन-संन्यासच घेतला पाहिजे. हाच आमचा शहाणपणा आहे—आमची कीर्ति टिकविण्याचा तोच एक उपाय आहे ! असे म्हणून त्यांनीं सहस्रबुद्ध्यांचे पत्र फाडून त्याचे तुकडे केले.

त्याना आतां खरें समाधान वाटूं लागले.

* * *

—आणि हे जर सहस्रबुद्ध्याना कळले असते, तर शहाण्याचेंच म्हणणें खरें आहे हें त्यानींही कबूल केलें असतें.

---

# तांबडा कोट

डॉ. कु. सुमति क्षेत्रमाडे यांच्या "पाढरें पातळ" या इंग्रजी कथाबीजावरून लिहिलेल्या एका लघुकथेचा उत्तरार्ध म्हणून "तांबडा कोट" ही लघुकथा लिहिण्यांत आली आहे. "पाढरें पातळ" या लघुकथेचा सारांश पुढीलप्रमाणें आहे :-

उमाकान्त पिंपळवाडींतल्या एका तिमजली चाळींतल्या एक-खणी खोलींत राहणारा एकाकी प्राणी होता. त्याला कुठल्याशा कारखान्यात कसलीशी नोकरी होती. आठवड्यातील सहा दिवसाच्या कामाचा शीण तो रविवारीं मनसोक्त चैन करून घालवी. त्याचा एक तांबडा ब्लेझरचा कोट होता आणि तो फक्त रविवारींच आपल्या अंगावर चढवी आणि एखाद्या कॉलेजियनच्या रुबाबांत बाहेर फिरावयास पडे.

एके रविवारीं सायंकाळीं अंधार पडण्याचे सुमारास त्याला लहानशा नीळसर किनारीचे जरा मळकट पांढरे पातळ नेसलेली १९-२० वर्षांची तरुणी दिसली. केळाच्या सालीवरून पाय घस-

रून पडल्यामुळें तिच्या गुडघ्याला बराच मार बसला होता. रमाकान्त तिच्या मदतीला धांवला आणि मग थोड्याशा विश्रांती-साठीं तीं दोघेंहि समोरच्या इराण्याच्या हॉटेलांत गेलीं.

उमाकान्ताला वाटलें—ती तरुणी गरीब असावी. अशा नाजुक सुंदर मुलीला वैभवाचें कोंदण शोभलें असतें. मोटारींतून जाण्याच्या योग्य-तेची, अन् बिचारीवर पायीं रखडत जाण्याची पाळी आली! कोणा-कडे तरी ही कामाला असावी असाहि त्यानें तर्क केला. त्यानें बोलण्याच्या भरांत तिच्यावर खूप 'इंप्रेशन' मारलें. त्याच्या बोलण्या-वरून हा कोणीतरी ऐश्वर्यांत वाढलेला एखादा धनिकपुत्र असावा असा तिचा समज झाला.

त्यानंतर तिनें त्याचा निरोप घेतला व चौपाटीवरच्या एका भव्य बंगल्याच्या फाटकातून ती आंत शिरली. घरीं आल्यानंतर तिनें आपल्या बहिणीला झालेला प्रकार सांगितला. तो खूप श्रीमंत असावा असेंहि तिनें सांगितलें, व म्हणाली, 'मला श्रीमंत बिलकूल नको!' तो गरिब असता तर तर बरें झालें असतें असें तिला वाटलें अन् तो गरीब नाहीं या समजुतीनें, त्याला आपण आपलें हृदय अर्पण करणार नाहीं असें ती तिला सांगते व याच ठिकाणीं गोष्ट संपते. ]

* * *

उमाकान्त नेहमींप्रमाणें आपल्या कारखान्यातील त्या प्रचंड यंत्रापुढें उभा राहून काम करीत होता. त्या यंत्राशीं त्याची सारखी धडपड चालू होती. पण आज त्याचें लक्ष आपल्या कामाकडे मुळींच नव्हतें; त्याच्या मनात कसली तरी चुटपूट लागून राहिली होती. त्याच्या साडेतीन हात देहाच्या कारखान्यातील हृदयरूपी यंत्रात कसला तरी बिघाड झाला होता. आपल्या समोरच्या निर्जीव लोखंडी यंत्राच्या निरनिराळ्या चाव्या फिरवून तो त्याला मार्गावर आणीत होता; पण त्याच्या शरीरांतील यंत्र आज मुळींच काम

देईनासें झाले होतें. क्षणाक्षणाला त्याच्या मनाची हुरहूर वाढत होती.

कारखान्यातील यत्राचा धडधडाट त्याच्या हृदयाच्या धडधडाटांत ऐकूं येत नव्हता. समोरच्या यंत्राचीं चक्रे जितक्या झपाट्याने व वेगाने फिरत, त्यापेक्षाहि त्याच्या मस्तकातील विचारांचीं चक्रें अधिक वेगाने फिरत होतीं. त्याच्या डोळयासमोर तीं अजस्र आणि काळींकभिन्न अक्राळविक्राळ यत्रे दिसत नव्हतीं, तर कालची ती लहानशा नीळसर किनारीच्या मळकट पाढऱ्या पातळातील १९।२० वर्षाची सुंदर तरुणी दिसत होती.

काय पण स्वर्गीय सौंदर्य होते—

त्याचं मन आतां त्या कारखान्यातून उडून स्वर्गात भराऱ्या मारू लागले होतं; पण फारच गरिबाची दिसतेय् बिचारी. त्या मळकट पाढऱ्या पातळात देखील ती कितीतरी मोहक दिसत होती. नाहीं तरी चिखलानं वेढलेल्या कमळाचं सौंदर्य थोडंच कमी होत असतं! तसच आहे झालं हे! जातीच्या सुंदराना काहीहि चागलंच दिसतं. अशा नाजुक सुंदर मुलीला खरोखर वैभवाचं कोंदण पाहिजे; पण, म्हणतात ना, देव आहे तिथ फुल नाहीत, नि फुल आहेत तिथ देव नाहीं.

कोण कोण असतील बर तिच्या घरीं? वडील असतील का तिचे? अन् असले तर काय उद्योग करीत असतील? असतील झालं आमच्यासारखच जीवन रखडीत, दुसरं काय? तिच्या त्या 'अवतारा'वरूनच दिसतेय् त्यांची घरची स्थिति; तसंच आई असेल का तिला? असलीच तर सख्खी असेल का सावत्र? बहुतेक सख्खी नसावी आई. नाहीं तर तिने तिला असल्या मळकट पातळांत नसती बाहेर पाठवली कुठं!

अन् ती कुठं बरं राहात असावी? ज्या भव्य बंगल्याच्या फाटकांतून ती आत शिरली त्याच बंगल्यांत ती राहत असेल का?—छट्!

कोण राहूं देतो तिला तिथं ! केवढा मोठा बंगला तो ! एखादा धनजी शेट नाहीं तर कुबेरपंत राहत असेल तिथं ! मग—ती तिथं का गेली ? असेल झालं—कोणी तरी तिची मैत्रीण तिथं राहत ! वा ! तिची मैत्रीण अन् त्या बंगल्यात ? छान ! हिऱ्याची अन् कोळशाची कधीं मैत्री होण शक्य तरी आहे का ? काय म्हटलं ? हिरा नि कोळसा ? त्यांपैकीं हिरा कोण व कोळसा कोण ? कोळसा कोण ते मला माहित नाहीं; पण हिरकणी मात्र माहित आहे नि तिला मी ओळखतोंहि चांगला ! हिरकणी—खरंच हिरकणी—त्या भव्य बंगल्यात राहण्याचीच तिची खरी योग्यता आहे. पण, योग्यता असून उपयोग काय ? मालकीण थोडीच असणार ती त्या बंगल्याची ? असेल झालं एखादी मोलकरीण—

पण, ती कल्पना उमाकान्ताला असह्य वाटली. वस्तुस्थिति काय असावी याची त्याला मुळींच कल्पना नव्हती. केवळ हवेत मनोरे उभारून होता तो; साराच कल्पनेचा खेळ, पण त्या खेळात देखील त्याच्या 'ती'नें कोणाची मोलकरीण व्हावं ही कल्पना मात्र त्याला सहन झाली नाहीं; आणि कोणाला होणार ? आपल्या प्रेयसीनें—

प्रेयसी—ही कल्पना मात्र उमाकान्तला भारीच आवडली;

हो ! काय हरकत आहे तिला प्रेयसी मानायला ? तिचं माझं न जमायला ती श्रीमंताची पोर आहे थोडीच ! तीहि असणार माझ्यासारखीच गरीब ! बाकी कालचा माझा तो रुबाब नि तो अप-टु डेट पोशाख पाहून नि माझी ती बंडलबाजी ऐकून तिला काय वाटलं असेल ? काय कल्पना केली असावी तिनं ?—

तिला खास वाटलं असलं पाहिजे कीं, आपण कोणी तरी बड्या बापाचे लाडके असून आपण अगदीं वाळकेश्वराला राहून मोटरी उडवीत असू !

अन् मग तिनं जर खरोखरच अशी कांहीं विपरीत कल्पना करून घेतली असली तर ?—

तिला काय वाटलें असेल ?

—कीं, ‘ आपण गरीब नि तो श्रीमंत ! कसं जमणार आपलं !’ छट् ! फारच वाईट आहे मग तें ! कशाला झक् मारली नि आपण इस्त्रीचे कपडे घातले ते ! पण, आतां हळहळून काय उपयोग ? काल जर आपण आजच्या आपल्या या कपड्यांतच असतों तर ?—

—तर तिला खास वाटलं असतं कीं, ‘ आपलं नि याचं जमायला कांहींच हरकत नाहीं ’ पण—

—पण, आपला तो लाल ब्लेझरचा कोट ’ नि ती इस्त्री मारलेली पांढरी शुभ्र पॅंट–

खरंच ! चागल्या पोशाखात राहणं हें देखील गरीबाच्या हानीला कारणीभूत होतं म्हणायचं ! हातांतून एकदा पक्षी उडून गेल्यानंतर पश्चात्ताप करून काय उपयोग ?

पण, निदान तिचं नांव तरी विचारून घ्यायचं होतं; चुकलंच सार तें ! धांदरटपणाच झाला ! अन् होणार नाहीं तर काय ? पहिलाच प्रसंग होता माझ्या आयुष्यांतील तो परक्या मुलीशीं अन् त्यातूनहि सुंदर मुलीशीं बोलण्याचा ! पण म्हणून काय झालं ? विचारून घेतल असत नाव तर तेवढंच !–

—तेवढंच काय ? नाहीं विचारलं तेंच बरं केलं. अन् समजा विचारलं असतं नि तें कळलं असतं तर त्याचा फायदा काय होता मला ? हॅंगिंग गार्डनवर हिंडत असताना आपणाला अनेक फुलं दिसतात. कुठं असतात आपणाला त्या सर्वांचीं नांवं माहित ? नाव माहित नसलं म्हणून त्यांच्यातील सौंदर्य थोडंच कमी होतं ? शेक्सपियरनं म्हटलंच आहे कीं नाहीं—

पण शेक्सपियर काय म्हणतो याचा विचार करायला त्याला सवडच मिळाली नाहीं. त्यानें कशालासें म्हणून त्याच वेळीं मागें

वळून पाहिलें नि एकाएकीं सारीं यंत्र जशीं बंद पडतात त्याच-प्रमाणें त्याच्या मनातील विचारही थंडावले! त्याला आश्चर्याचा मोठाच धक्का बसला. त्याचा आपल्या डोळ्यावर विश्वासहि बसेना! त्याला आतां स्वतःचीच लाज वाटूं लागली. कुठें तरी पळून जावें असे त्याला वाटलं; पण, जाणार कुठें? काम कोण करणार इथें? अन् आतां जाऊन तरी उपयोग काय?

कारण जे व्हावयास नको होतें तें झालें होते. त्याची 'ती' त्याच्याच रोखानें येत होती. दोघांनींहि एकमेकाना ओळखलें होतें. अगदीं हंसत हसत ती त्याच्यापाशीं आली नि—

"अय्या ऽऽ हा उद्योग करता वाटतं तुम्ही?"

तिचा त्या वेळचा तो अभिनय एरवीं उमाकान्ताला भारीच मोहक वाटला असता; पण या वेळीं मात्र तो खूपच खजील झाला; अगदीं जिव्हारी सुरी खुपसल्यासारखें वाटले त्याला. त्याने मान खालीं घातली—

पण, त्याच्या तल्लख मेंदूने त्याची बाजू सावरून धरली. काल चहा पीत असता आपण ज्या थापा मारल्या होत्या, त्याचाच आता आपण उत्तरपक्ष करावा अशी त्याला कल्पना सुचली. त्याच्या चर्येवर हास्य उमटलें, डोळ्यात प्रभा चमकली, त्याने मान वर केली आणि—

"हो! आमचा हा उद्योगच आहे; आमच्या वडिलाचाच हा कारखाना! बाहेर भेटलेच असतील तुम्हाला ते. मोठे करारी नि कडव्या बाण्याचे बरं का? गेल्या वर्षींच मी अमेरिकेंतून इंजीनियरिंगची उच्च पदवी घेऊन आलों; पण आमच्या वडिलानीं आम्हाला हुकूम फर्माविला कीं—ते तसं नाहीं—मालक झालों म्हणून काय झालं? मालकानच सर्व कामगारांना धडा घालून दिला पाहिजे. त्याशिवाय का कामं होतात सारीं बिनचूक? म्हणून आमची नेमणूक झाली इथं! फारसं श्रमाचं काम करावं लागत नाहीं

म्हणा! आहेत हाताखालीं पाच-सहा माणसं. त्यांच्याकडून आपण कामं करून घ्यायचीं नि आपण हुकमत गाजवायची—"

तो आणखी कितीतरी बडबडत होता व त्याची ती बडबड ऐकून ती मनांतल्या मनात खूप हंसत होती. त्याच्या कल्पकतेचें कौतुक करीत होती.

"पण, तुम्ही इकडे कोणीकडे आलात आज?" सारी बडबड संपल्यानतर त्यानें तिला विचारलें.

"कोण मी?—आले होते सहज आमच्या मालकाबरोबर. ते पाहिलेत का—बॅ. पंडित? त्याच्याकडेच असतें मी कामाला! त्यांच्याबरोबर आले, कारखाना पाह्यला. पण बरं झालं आले तीं—अनायासे तुमचीहि पुन्हा भेट झाली—" हे बोलत असतांना तिच्या चेहऱ्यावर छद्मी हास्य चमकत होतें; पण त्याकडे त्याचे आता लक्ष नव्हते. तो बॅ. पंडिताच्या दिशेकडे पाहत होता. बॅ. पंडित—म्हणजे आपल्या मालकाचे एकुलते एक चिरंजीव—नि—ही त्याच्या घरची मोलकरीण?—

अरे बाप रे! अन् आपण आता काय थापा मारल्या तिच्या-समोर, कीं आपले वडील या कारखान्याचे मालक आहेत म्हणून—

त्याच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला, पाय लटपटूं लागले, त्याचे हृदय आतां फारच जोराने धडधडूं लागलें.

त्यानें तिच्याकडे पाहिलें. तिच्या मुखावर तेंच छद्मी हास्य दिसत होतें.

त्याला वाटलें, कीं आता आपण समोरच्या खूप मोठ्या भट्टींत जाऊन जीव द्यावा—

पण, त्यानें जीव दिला नाहीं.

"शाले ऽ ऽ"—

त्याच्या कानावर हाक पडली—

“ बरंय्; येते मी–ओळख ठेवा म्हटलं ! ”—स्वप्नांतून जागें झाल्याप्रमाणें तो एकदम भानावर आला तिचे शब्द ऐकून. तो किती मोठ्यादा तरी दचकला !

शाली निघून गेली.

त्या दिशेकडे तो किती तरी वेळ पाहत होता.

“ ए ताई, तुला मी काल एक गंमत सांगितली होती ना ? कीं मला टपोऱ्या काळ्याभोर डोळ्यांचा, उंच व धिप्पाड तरुण किती-किती आवडतो म्हणून ? त्याला पांढरी पॅट न् लाल ब्लेझर देखील किती शोभून दिसतो म्हणून मीं तुला सांगितलं होतं ! खरंच, त्या पोशाखातला तो, निळसर मळकट लांबलचक झग्यात देखील चांगला दिसतो. त्याचे ते पीळदार दंड नि दणकट मनगट मला फारच आवडले. अन् बरं का ताई, तो श्रीमंत देखील नाहीं. मी तुला सांगितलं होतं कीं, मला श्रीमंत बिलकुल नको ? बॅ. पंडित श्रीमंत आहेत नि तो गरीब आहे. मला असलाच हवाय् ! ” तिच्या त्या वेड्या बडबडीचा तिच्या ताईला काहींच बोध झाला नसला, तरी शालीचें अंत:करण हर्षभरानें खूपच उचंबळून आले होतें. तिच्या चर्येवर कसला तरी ठाम निश्चय झाल्याचा भाव स्पष्ट उमटला होता.

———

# पतंग आणि ज्योति !

—दीपज्योति आपल्या शात, शीतल नि सोज्वल दीप्तीनें तळपत होती. तिचा मंद नि आल्हादायक प्रकाश मनाला उल्हसित करीत होता. चोहींकडे परमपवित्र मंगल वातावरण पसरलें होतें.

—तिच्यांत सौदामिनीचा रंगेल नखरा नव्हता, उत्तान झगझगीत पणा नव्हता कीं डोळे दिपविणारें सौंदर्याचें तेज नव्हतें.

—लोक म्हणत, ‘ज्योति स्वयंतेजानें तळपणारी आहे, सौदामिनीसारखें कृत्रिम आणि क्षणभंगुर जीवन तिला नाहीं.’

—आणि म्हणूनच ज्योतीबद्दल सर्वांना आदर नि प्रेम वाटत असे.

—तिच्या त्या सालस नि सरळ वृत्तीचा लोकाच्या मनावर फारच अनुकूल परिणाम होई.

—तिचें बालपण अवखळपणें बागडणाऱ्या लहान बालकाप्रमाणेंच फडफडण्यांत गेलें.

—ऐन तारुण्यांच्या तोंडीं येताच तिची दीप्ति अधिकच प्रज्वलित झाली—आणि ती फारच सतेज दिसूं लागली.

—आपल्या मानस पित्याचा—अनिलचा—तिला फारच विश्वास वाटायचा ! तो आपला जीवनाधार—उपकारकर्ता आहे असेंच तिला वाटत असे.

—पण अनिलच्या पापी नजरेची तिला कांहींच कल्पना नव्हती. अनिलनें केलेल्या खोड्या ती थट्टेवारी उडवून द्यावयाची. कधीं कधीं अनिल तिच्या अंगलट येऊन तिचे चुंबन घेण्याचा प्रयत्न करायचा—पण ती आता काहीं लहान बालिका नव्हती; वयात आलेली नवयौवना होती. अनिलचा दुष्ट हेतु लक्षांत येताच ती घाबरून जात असे. तिच्या जिवाचा अगदीं थरकाप व्हावयाचा ! पण, तशाहि स्थितींत तिला कसल्या तरी अज्ञात शक्तीचा आधार वाटत असे. आपण जोपर्यंत 'स्नेहा'शीं एकरूप झालो आहोत आणि आपली आई—वात—आपल्या पाठीशीं आहे तोंपर्यंत आपणाला झंझावाताचीदेखील पर्वा नाहीं असा तिला आत्मविश्वास वाटे !

—ज्योतीच्या सुंदर मुखावर षोडषवर्षा बालिकेचा निर्व्याज आनंद नि पावित्र्य तळपत होतें. पापी नजरेनें तिच्याकडे पाहण्याची कोणाचीहि शक्ति नव्हती. तिला आपल्या तेजस्वी नेत्र-कटाक्षांचा भारी अभिमान वाटत असे. आपल्या नेत्रातून निघणाऱ्या पावित्र्याच्या ज्वालेनें आपण दुष्टाना भस्मसात करून टाकूं असा तिला विश्वास वाटत असे. म्हणूनच तिच्या वाटेस कधीं कोणी जात नसे. कोणी तिच्या दीप्तीचें—तेजाचें—पावित्र्याचे—अल्लड वृत्तीचें कौतुक करीत, कोणी तिच्या मुग्ध सौंदर्याची वाखाणणी करी, एखाद दुसऱ्या क्षुद्र कीटकाचा तिला उपद्रवहि होई, पण तिला त्या सर्वांच्या वृत्तीचा कधींच हर्षखेद होत नसे !

—यौवनाचा भर ज्योतीच्या रोमरोमांत भिनून राहिला होता. ती आतां बरीच लाजरी नि गंभीर दिसूं लागली. अनिलची पापी दृष्टि तिला आतांशा अधिकच तापदायक वाटूं लागली.

पण—

—ज्योतीच्या जीवनांत क्रांति घडवून आणणारा दिवस लौकरच उगवला.

—तिच्या मंद आणि मंगल तेजावर मोहित होऊन एका पंतगानें तिच्याशीं परिचय घडवून आणला.

—ज्योति आणि पतंग—

—दोघाचेहि अल्लड, खेळकर नि निष्पाप तारुण्य बहराला आलें होतें.

—आपण काय करतों आहोत हे दोघानाहि कळत नव्हतें.

—वातीच्या नजरेस त्याचा हा परिचय आला होता. तिला त्यात वावगे काहीच दिसले नाही.

—हळुहळू ज्योति आणि पतंग याच्या परिचयाची परिणति सह-वासाच्या द्वारें प्रेमात झाली.

दोघेहि परस्परावर मोहित झाले होते—आकर्षिले गेले होते—दोघांनाहि एकमेकाबद्दल आपुलकी—प्रेम वाटत होते, दोघेहि एक-रूप होण्यासाठीं—गाढ प्रेमालिंगन देण्यासाठीं आतुर झाले होते.

—ज्योतीला वाटायचें, पतंगाने आपलें हृद्गत प्रथम उघडें करावें—प्रेमयाचना करावी !

—पतंगालाहि अगदीं तसेच वाटत होतें.

—पण ज्योतीच्या हृदयाचा ठाव त्याला अद्यापि लागला नव्हता—तिच्या प्रेमाविषयीं तो साशंक होता—कां कोणास ठाऊक !

—तिचा मुग्धपणा त्याच्या मनांत अगदीं गोंधळ उडवून देई आणि मग तो खूप निराश होई.

—दिवसामागून दिवस भराभर निघून जात होते.

—पतंग अगदीं न चुकता ज्योतीकडे जावयाचा !-तेवढीच त्यांची दृष्टिभेट.

—कधीं कधीं अनिलाचा त्या दोघानाहि त्रास व्हायचा ! त्याचा संबंध येऊं नये—त्याचे प्रणयमीलन होऊं नये यासाठीं तो आटोकाट प्रयत्न करावयाचा ! पण, त्या दोघाचे प्रेम निश्चल होतें—काळालाहि त्यांत विघ्न आणता येणें शक्य नव्हतें—

—निदान त्या प्रणयाच्या धुंदीनें तरी त्याना असेच खात्रीनें वाटायचे !

—एके दिवशीं पतंगाने ज्योतिपाशीं आपले हृदयमंदिर खुलें करण्याचे ठरविलें.

—त्याला वाटले, ज्योतीला त्यामुळे आनंदच होईल.

—शिवाय,

—तिच्या मातेची—वातीचीहि—त्याला मुग्ध संमतीच मिळेल अशीहि त्याला खात्री होती.

—पण, दुर्दैव त्याचें !

—त्याला ज्योतीच्या वर्तनात त्या दिवशीं कमालीचा रुक्षपणा दिसून आला.

—तिची चर्या खूपच काळवंडली होती.

—तिने त्याच्याकडे प्रेमभराने पाहिले नाहीं कीं नेहमींप्रमाणें प्रोत्साहनहि दिले नाहीं !

—पतंगाला वाटले, ज्योति आपणावर रुष्ट झाली असावी.

—आजपर्यंत आपण प्रेमयाचना केली नाहीं याबद्दल त्याला आतां पश्चात्ताप होऊं लागला.

—कदाचित् तिचें आपणावरील स्नेह—प्रेम संपलें असावें असाहि त्याला भास झाला.

—आणि खरेंच !

—त्यानें जवळ जाऊन पाहिलें...खरोखरच 'स्नेह' संपलें होतें.

—पतंगाची दारुण निराशा झाली !

—तो हताश झाला. त्याचीं गात्रें शिथिल झालीं. शरीरांत त्राण उरलें नाहीं.

—त्याला आतां जीवनांत काहींच सार राहिलें नाहीं असें वाटलें!

—निष्प्रेम जीवनापेक्षा मृत्यूचा आसरा बरा असा विचार त्याच्या मनात येऊन गेला.

—त्यांतच अनिलाच्या कुटिल कारस्थानाचा फटका त्याला जोराचा बसला.

—अनिलाचें कारस्थान यशस्वी झालें.

—पतंगाच्या डोळयांदेखत अनिलानें ज्योतीचा हात तिमिराच्या हातात दिला.

—ज्योतीने अखेरची धडपड केली–पण ती निष्फळ ठरली.

—पतंगाला हें दृश्य पाहवलें नाहीं.

—प्रेमज्योति त्याच्या जीवनातून निघून गेल्यावर तो आतां कोणासाठीं जगणार होता ?

—त्यानें फडफडणाऱ्या ज्योतीच्या चरणांवर एकदम झडप घातली आणि शेवटचा श्वास सोडला !

—त्याच वेळीं तिमिरानेंहि ज्योतीला दिगंतांत ओढून नेली !

—तिमिर केवढ्यानें तरी भेसूरपणानें हंसला !

—त्यामुळें आसमंतातील भयाणता अधिकच वाढली !



# सौंदर्योपासक

" राजा ! राजा ! कोण रे ती ? " राजाच्या पाठीवर एक जोराची थाप मारून मन्या म्हणाला, " काय पण सौंदर्य ओसंडतंय् नुसतं ! खरोखरंच ! A thing of beauty is a joy for ever ! ओऽह ! अस्मानची परीच जणूं ! माहितीची आहे कां रे ती तुझ्या ? "

" वाऽपढे ! मला कुणी एखादा मुलींचा सेन्सस ऑफिसर समजतोस कीं काय ? का माझ्याकडे सुंदर मुलींची डिरेक्टरी आहे ?"

" अरे, तसं नव्हे रे ! पण बेफाम पोर आहे, नाहीं ? तें तिचं चापून चोपून नेसलेलं लाल कांठाचं पांढरं पातळ, पाठीवर रुळणारा तिचा तो वेणीचा लांबलचक शेपटा, त्यावर डोलणारं गुलाबाचं फूल, भुरभूर उडणारी कपाळावरची बट, तिचं तें मुरडून चालणं अन्—"

" मला रे काय माहीत असणार ? साऱ्या मुलींचीं नावं नि पत्ते तुला पाठ, मी काय तुझ्यासारखा Love Prince आहे ? " राजानें त्याची जिरविण्याच्या हेतूनें म्हटलें.

" अरे पण लेका, पुढचा खड्डा तरी पाहशील कीं नाहीं ? मग उंच टांचा करून नि वाकडी मान करून पाहा." मीं मन्याला सावरीत म्हटलें.

" जाना दे बे ! पण खरंच असलं मारू सौंदर्य आपण कधीं कुठं पाहिलं नव्हत बुवा."

" मन्या लेका, तुला सौंदर्य नि प्रेम याखेरीज दुसरं काहीं दिसतच नाहीं का रे ?" मी मन्याचा खादा जोराने हलवीत म्हटलें.

" वा ! त्याशिवाय का मन्याला Love Prince हा किताब मिळाला ?" राजा मिस्कीलपणाने मन्याकडे पाहात हंसत म्हणाला.

" पण खरंच कोण रे ती ?" मन्यानें अधीरपणें पुन्हा पृच्छा केली. या वेळपर्यंत मन्याची सौंदर्यदेवता दृष्टिपथातून केव्हाच दूर गेली होती.

थोडा वेळ कोणीच काहीं बोललों नाहीं. आता आम्हीं फर्ग्युसन हिल उतरून सरळ रस्त्याला आलो होतो. मन्याचे मन अस्थिर झाल्यासारखे दिसत होते. राजाच्या मनात काय घोळत असावं हे कळण्यास मार्ग नव्हता आणि तसे काहीं असावेसें वाटतहि नव्हतें; कारण तो खरा स्पोर्टस्मन होता, व माझ्या मनात–पण मी बराच गंभीर झालो होतो हे खरे. माझा हा गंभीरपणा पाहून मला मन्या म्हणाला, " काय तत्त्वज्ञ, कसला विचार चाललाय् ? ज्ञेयवाद खरा कीं अज्ञेयवाद खरा यासंबंधीं, कीं नुकतंच गेलेलं हें चालतंबोलतं निसर्गसौंदर्य, त्याची मीमांसा चालली आहे ?"

" का ? आपणावरून जगाची पारख चालली आहे वाटतं ?" मी त्याची जिरविण्याच्या हेतूने बोललों. पण माझ्या मनांतील भाव लपणारे नव्हते.

" छान ! आम्हाला बनवण्याचा विचार दिसतोय् ? पण ती लटपट माझ्याजवळ नाहीं हं चालायची !–पण हे पाहा नान्या," मन्या

पोक्तपणाचा आव आणून म्हणाला, "Love at first sight, हें तत्त्व दिसायला गोड दिसत असलं, तरी व्यवहारात त्याचा कांहीं उपयोग नाहीं."

"हे अनुभवाचे बोल वाटतं?" राजानें मन्याला पुन्हां डिवचलें.

"तूं काहींहि म्हण राजा, पण नान्याची मनःस्थिति चलविचलित झाली आहे हे मात्र खरं."

मन्याच्या मताप्रमाणे माझी मनःस्थिति चलविचलित झालेली नसली, तरी कसल्या तरी भावनेची चमक माझ्या मनात चमकून गेली होती हे खास!

[२]

मन्या, राजा व मी हे त्रिकूट साऱ्या फर्ग्युसन कॉलेजात महशूर होतें. आम्हां तिघांचेहि स्वभाव व मनोविचार अगदीं भिन्न भिन्न असले, तरी आमची मैत्री दृढ होती. मन्या तसा घरचा खाऊन पिऊन सुखी होता, त्यामुळें कॉलेजच्या स्वतंत्र वातावरणांत आल्याबरोबर त्याच्या उच्छृंखल विचाराना पंख फुटून ते स्वैर धावू लागल्यास नवल नाहीं. असें असलें, तरी तो मनानें दुष्ट, विचारानें नीच किंवा आचारानें नावें ठेवतां येण्यासारखा त्याचा स्वभाव नव्हता, तर त्याची फुलपाखरी वृत्ति होती. या फुलावरून त्या फुलावर उडी मारून मजा करावयाची, खूप हंसा–खिदळावयाचें, निरनिराळ्या आधुनिक फॅशन्सनीं नटावयाचें अशी त्याची वृत्ति होती. त्याच्या या स्वभावामुळें इतराना त्रास किंवा उपद्रव होत नसे. पण कधीं कधीं त्याच्या सौंदर्यलोलुपतेच्या अतिरेकामुळें मात्र तो स्वतःला हास्यास्पद करून घेई. पण हे मात्र खरें कीं त्याची विद्यार्थिनींत इतकी ओळख होती व तो त्यांच्यावर इतकें Impression मारून होता कीं, तो विद्यार्थीजगात Love prince या नांवानेंच ओळखला जात असे.

आतां यांत उपरोध किंवा उपहास नसेल असें मात्र म्हणवत नाहीं; कारण त्याच्या या मुलींच्या पुढें पुढें करण्यामुळें त्याचा आचरटपणाहि सिद्ध होई; पण त्याची त्याला कदर नव्हती—किंबहुना त्याची त्याला कल्पनाच नसावी. आज इंदु अभ्यंकरला नोट्सची वही दे, तर उद्यां कुसुम गोखलेच्या घरीं चहाला जा, तर परवां मंदाकिनी प्रधानला सिनेमाचा शो दाखीव हे प्रकार नेहमींच घडत. अमकीनें आज हातरुमाल दिला, तर दुसरीनें पेन दिलें, याहि गोष्टी त्याच्या सर्कलमधील मित्रांना नवीन नव्हत्या आणि याच आनंदात तो नेहमीं गर्क असे. अर्थात् या सौंदर्य आणि प्रेमाच्या पायीं व 'पिकेटिंग'च्या मोहानें त्यानें आपल्या अभ्यासाचा बाजा वाजविला होता आणि त्याच्या या वृत्तीचीच मला कींव येई. त्याच्या विचारात सखोलपणा कसा तो नव्हताच. कॉलेज, सुंदर तरुणी, प्रेम आणि मजा यावाचून त्याला दुसरें कांहीं सुचतच नसे आणि हीच वृत्ति त्याच्या आयुष्याला मारक होईल अशीच मला साधारण भीति वाटत होती.

[ २ ]

मनोहराच्या या मधुकरवृत्तीची वार्ता कोणाकडून तरी त्याच्या मामाच्या कानीं गेली व पोराचा पाय अडकवून टाकला पाहिजे या समजुतीनें त्यांनीं वधूसंशोधन चालविलें. आपल्या विवाहाची घटना घडत असल्याचें वृत्त ऐकून मनोहराचें मन अस्वस्थ झालें; कारण मामानें पसंत केलेल्या मुलीशीं विवाहबद्ध व्हावें असें त्याला वाटत नसे; तर प्रेमविवाहाचा—सहवासोत्तर प्रेमविवाहाचा—तो पुरा पुरा पुरस्कर्ता होता. प्रीतिविवाह आणि सौंदर्यसंपन्न अशा युवतीशींच प्रीतिविवाह करावयाचा अशी जवळ जवळ त्याची प्रतिज्ञाच होती. अर्थात् मामांच्या या लुडबुडेपणाचा त्याला संताप यावा हें साहजिकच होतें. पण करतोय् काय, त्याची सारी शेंडी त्याच्या मामांच्याच हातीं होती. ते म्हणतील त्याला मान्यता देणें त्याला भागच होतें.

तथापि त्यानें प्रथम स्पष्टपणें नकारच लिहून कळविला; पण नंतर दोघांचीहि तडजोड होऊन मनोहरच्या पसंतीनें लग्न करावयाचें ठरलें.

[ ४ ]

त्यानंतर कांहीं आकस्मिक कारणामुळें मला पुणे सोडून मुंबईला कॉलेजांत जावे लागलें व आमच्या त्रिकूटातील मी फुटून मन्या-राजाची दुक्कलच राहिली. मी मुंबईस गेल्यानंतर प्रथम प्रथम आमचा मामुली पत्रव्यवहार होत असे; पण नंतर तो कमी कमी होत जाऊन पुढें बंदच पडला. अर्थात् मन्याचें लग्न ठरलें किंवा कसें अगर त्याला कितपत सौंदर्यवान् मुलगी मिळाली, यासंबंधींची मला कांहींच माहिती मिळाली नाहीं.

बी. ए.च्या परीक्षेचे पेपर्स देऊन मी चार दिवसासाठीं पुण्यास गेलों होतों. सवड सापडताच मन्याची व राजाची भेट घेण्याचा मी प्रयत्न केला. मन्या आपल्या गांवीं सहा महिन्यापूर्वीच गेल्याचें राजाकडून मला कळलें. त्याचप्रमाणें त्याची इतरहि माहिती मला त्याच्याकडून समजली. गेल्या दीड-दोन वर्षांत मन्याच्या आयुष्यांत बऱ्याच क्रांतिकारक घडामोडी झाल्याचें आढळून आलें व तें ऐकून मला अत्यंत वाईटहि वाटलें. त्याच्यासंबंधींच्या माझ्या पूर्वीच्याच कल्पना खऱ्या ठरल्या होत्या. राजा म्हणत होता. "गेल्या वैशाखांतच मन्याचं लग्न झालं."

"कुठली अप्सरा मिळवलीन् बेट्यानं ?"

"हं" राजा दीर्घ सुस्कारा टाकून म्हणाला, "कसली अप्सरा न् कसली रंभा घेऊन बसला आहेस ? स्त्री आहे इतकंच !"

"म्हणजे ? छट् ! असं कधीं होणारच नाहीं. थट्टा तर करीत नाहींस माझी ?"

"छे ! थट्टा नव्हे रे ! अगदीं खरंच आहे हें सारं. पण आश्चर्य याचंच वाटतं कीं, मन्यासारख्या सौंदर्याच्या बाबतींत फाजील

चोखंदळ माणसानं जवळ जवळ कुरूपच मुलीशीं लग्न लावावं? अरे, मुली पाहायला मीं जातच असे कीं त्याच्याबरोबर! त्या वेळीं त्यानं किती पण सौंदर्यचिकित्सा केली! कुणी रंगानं किंचित् काळीच आहे, तर कोणाचे डोळेच घारे आहेत; कोणाचं नाकच नॉर्मा शिअररप्रमाणं नाहीं, तर कोणात जेनेट मॅक्डोनल्डचा लाडिक हंसरेपणाच नाहीं. सत्राशें दोष पठ्यानें काढले असतील. वास्तविक, पाहिलेल्या मुलींपैकीं शेकडा पन्नास तरी रूपानं बऱ्या होत्या. त्याच्या या फाजिल चौकस स्वभावावर एका मुलीनं मात्र चागलीच मात्रा दिली व त्याला स्वतःची शोभा करून घ्यावी लागली. त्या वेळेपासून स्वारीनं वधूपरीक्षणाची ही मोहीम एकदम बद केली. त्यानंतर कर्मधर्मसंयोगानं त्याचे मामा वारले व त्याला कॉलेजला रामराम ठोकावा लागला. शेवटीं कंटाळून बिचाऱ्याला देवींचे वण तोंडावर असलेली कृष्णवर्णीय मुलगीच पत्करावी लागली."

"पण काय रे, हुंडा–बिंडा चागलाच मिळाला असेल बेट्याला, नाहीं? नाहीं तरी पैशांशिवाय का तो तयार झाला असेल?"

"अरे, कसला पैसा घेऊन बसलायस, नाना! मन्याचा स्वभाव तुला माहितच आहे. आधींच उच्छृंखल वृत्ति आणि त्यातच घरात एकलकोंडेपणा–केलं झालं कस तरी लग्न. कोणी कोणासंबंधीं उणं बोलूं नये हेच खरं!"

राजाच्या घरून निघाल्यानंतर मनोहरच्या जीवितासंबंधींच माझ्या मनांत विचार चालू होते. खरें पाहिले असता त्याच्या या फाजिल सौंदर्यलोलुपतेमुळें त्याने आपल्या आयुष्याचा एक प्रकारें नाश करून घेतला होता व प्रेमाच्या व सौंदर्याच्या बाबतींत त्याला भयंकर निराश व्हावे लागले होते.

[५]

मी आता पुण्यास येऊन वकिली करूं लागलों होतों. एके दिवशीं सकाळीं मंडईतून घरीं येतांना अचानकपणे मनोहर मला

भेटला-भेटला कसला, त्यानेंच मला जोरानें हांक मारली. त्या वेळचा त्याचा अवतार पाहून मला मनस्वी वाईट वाटलें व सहा वर्षांपूर्वीचा कॉलेजियन् मन्या तो हाच का अशीहि शंका माझ्या मनांत आली! आतां तो बराच पोक्त झालेला व त्रासलेला दिसत होता. यावरून त्याला गृहसौख्य बेताचेंच असावें हे उघड होतें. मीं त्याला विचारलें, " काय मनोहर, हल्लीं कुठं असतोस ? "

" गावीं. "

" अन् तुमच्या मिसेस कशा आहेत? बेट्या, लग्नाला तरी बोलवायचं होतस ! "

पण माझ्या या शब्दानीं त्याच्या चेहऱ्यावर बरीच खिन्नता पसरली. अर्थात् मी त्याला अधिक डिवचले नाहीं. मोठ्या आग्रहानें मीं त्याला घरीं नेले. माझा आवाज ऐकताच नलू हंसतमुखाने ओच्याला हात पुशीत दिवाणखान्यात आली. मनोहरचे तिच्याकडे लक्ष जाताच तो बराच थिजल्यासारखा झाला. त्याची ही अवस्था पाहून मी नलूला चहा करावयास सागून आत पाठविले. मनोहर माझ्याकडे प्रश्न-चिन्हांकित मुद्रेने पाहात होता. शेवटीं त्याने मला विचारलेंच, " नाना, वहिनीला मी कुठं तरी पाहिल्याचं आठवतं ! "

" फर्ग्युसन हिलवर—" मी हंसत हंसत उत्तर दिले.

" अगदीं बरोबर, पण—"

" नलू पाटणकर मुंबईचीच. झेवियरला आम्हीं एकाच वर्गांत होतो. त्या वेळीं ती आपल्या मैत्रिणीकडे पुण्याला आली होती, आणि त्याच वेळीं तिच्या सौंदर्याबद्दल..."

" भाग्यवान आहेस नाना तूं! मग तुमचा हा प्रीतिविवाह—"

—" आणि मिश्रविवाहहि " मीं मनोहरचे वाक्य पुरे केलें.

नलूनें चहा आणल्यामुळें आमचें बोलणे तेथेच थाबले. त्याच्या अंतःकरणात भयंकर खळबळ—कसली तरी आग पेटल्याचें दिसत

होतें. आणि ती आग विझविण्यासाठींच कीं काय, तो अधाशा-सारखा चहा घशाखालीं ओतीत होता. ‘पण तुझं असं कसं झालं रे!’ मी असें म्हणतों आहे तोंच जाग्यावरून तो उठला व ‘बरंय्’ असें म्हणून जिन्याकडे वळला. जातां जातां त्याचें सांत्वन करण्याच्या उद्देशानें मीं त्याला म्हटलें, “हें पाहा मनोहर, आहे त्या स्थितींत सुख...” पण तो जवळ जवळ धांवतच जिना उतरून दिसेनासा झाला. त्यानें माझे शब्द पुरतेपणीं ऐकलेहि नाहींत!

---

# रूपगर्विता

" इश्श ऽऽ–माले! अजून नाहीं का ग झाला तुझा नट्टा–पट्टा? नाही तरी भारीच बाई चोखंदळ तूं!" लीली खोलींत प्रवेश करीत म्हणाली.

" यात कसला ग आलाय् नट्टा–पट्टा? कुठं जरा चापून चोपून पातळ नेसलं नाहीं तर लागली आपली टीका करायला!" मालीनें हंसत हंसत उत्तर दिलें व ती पायाला गार्टर्स बांधूं लागली.

" अग, पण त्याला तरी कांहीं काळ वेळ आहे की नाहीं?– हे पहा ५–२० झाले आणि ५॥ला तर प्रोग्राम!" मनगटावरील घड्याळाकडे पाहात लीली म्हणाली.

" हें पहा झालंच माझं!" असें म्हणून मालीनें तोंडावर पावडर उधळली.

आज फर्ग्युसन कॉलेजचें गॅदरिंग होतें. बरोबर ५॥ ला बॅ. जयकरांचा ॲड्रेस होता. अर्थात् त्याप्रसंगीं बडी बडी पाहुणे मंडळी हजर राहणार हें निश्चित होतें. त्यातच उत्साहभरित विद्यार्थी–विद्यार्थिनींच्या

जमावानीं मंडप फुलून जाणार होता. अशा वेळीं सौंदर्यशालिनी मालतीला आपल्या रूपाचें आणि सौंदर्यसजावटीच्या कलेचें प्रदर्शन करण्याचा मोह झाला असल्यास नवल नाहीं. मुळांतच ती अतिसुंदर. आपल्या सौंदर्यानें साऱ्या कॉलेजला तिनें वेड लावलें होतें. तिचा परिचय व्हावा, ओळख व्हावी, निदान तिच्याशीं चार शब्द बोलावयास मिळावेत म्हणून विद्यार्थ्यांमध्यें कोण अहमहमिका चाले, व त्यांतूनहि कर्त्या सुधारकाची ती एकुलती एक कन्या. सौंदर्य, स्वातंत्र्य व पैसा या त्रयीचा पाठिंबा असल्यानंतर आपण स्वर्गांची एकादी रंभाच आहोत असें मालीला वाटत असल्यास नवल कसलें !

पण आजच्यासारखी ती कधींच नटली नव्हती. तिच्या सौंदर्यमूर्तीवर दृष्टि खिळत नव्हती. मातीची बाहुली असती तर दृष्ट लागून तिचा चक्काचूर झाला असता. खरोखर विधात्यानें तिच्या निर्मितीसाटीं आपलें सारें कौशल्य खर्च केलें असावें. तिच्या केवळ दर्शनासाठीं तरुणानीं झुरणीस लागावें अशीच ती होती. आणि म्हणूनच आपल्या सौंदर्याचा अभिमानहि तिच्या रोमरोमात भरला होता. आधींच स्त्रीजात; त्यांतूनहि रूपमति तरुण ललना ! आपल्या सौंदर्याची स्तुति व्हावी; आपल्या सौंदर्याचे पोवाडे गायले जावे असें तिला का वाटूं नये ? आणि तसें व्हायचेंहि ! अनेक उल्लू कवींनीं तिच्यावर व तिच्या सौंदर्यावर प्रणयगीतें रचून कॉलेज–मॅगेझिनमध्यें छापूनहि काढलीं होतीं ! कांहीं तिचे स्तुतिपाठक होते, तर काहीं तिनें एकदां चुकून का होईना पण आपणाकडे पाहावें म्हणून बराच थाटमाटहि करून येत. विद्यार्थ्यांची ही उल्लू प्रवृत्ति मालीनें पूर्णपणे ओळखली होती. विचारस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य यामुळे तीहि मुलींप्रमाणेंच मुलांमध्येंहि सर्रास मिसळे. प्रत्येकाशीं बोलायची–हंसायची आणि खेळायचीहि पण ! याचा परिणाम व्हावयाचा तोच होई. प्रत्येकाला वाटे–माली आपणाशीं किती मोकळेपणानें

वागते ! कांहींनीं तर तिचें आपणावर प्रेम आहे अशी खोटी समजूत करून घेतली होती आणि त्याची ते आपल्या मित्रमंडळींत फुशारकी मारीत ! पण त्याना हें कुठें माहीत होतें कीं, मालीचे हें प्रेमचाळे म्हणजे माजरीचे उंदराशीच खेळ चालले आहेत !

गॅदरिंग म्हणजे विद्यार्थ्यांचा सणच ! त्याच्या उत्साहाला, विनोदाला आणि खिलाड्र वृत्तीला अगदीं भरच यायचा ! समारंभाला सुरवात होऊन पांचच मिनिटें झालीं असतील. इतक्यात मालीची मोटार पोर्चमध्ये येऊन थडकली. साऱ्या विद्यार्थ्यांचे लक्ष तिच्याकडे वेधले–सर्वत्र चुळबूळ सुरू झाली; विद्यार्थ्यांचे चेहरे फुलले.

सडपातळ आणि नाजूक देहलता, केतकीप्रमाणे सुंदर वर्ण, गुलाबाशीं स्पर्धा करणारे गाल, सरळ नासिका, नाकाच्या नाजूक पाकळ्या, तितकीच नाजूक जिवणी, मोत्याच्या दाण्याप्रमाणे दंतपंक्ति, दोन भिवयाच्या किंचित् वरच्या बाजूची कुंकवाची बारीक टिकली, कपाळावर भुरभुरणारे केस, पाठीवर नितंबभागापर्यंत रुळणारी वेणी, तीवर पर्णासह डुलणाऱ्या अर्धोन्मीलित दोन गुलाब कलिका, निळ्या खड्याच्या कानांतील कुड्या, चापून चोपून नेसलेलें काळ्याकिनारीचे निळे पातळ, अंगात घातलेला निळाच ब्लाऊझ व पायात काळ्या रेशमी पट्ट्याच्या नाजूक चपला—

हें सारे दृश्य एका क्षणात विद्यार्थ्यांच्या दृष्टींत सामावले गेलें; आणि——

* * *

मालती आणि मधुकर याच्या प्रेरणेनें आज बऱ्याच जणांनीं बनेश्वरची जॉली ट्रिप करण्याचा बेत केला होता; त्याप्रमाणें दोन तीन मोटारींतून हीं सर्व मंडळी सकाळींच बनेश्वरला गेलीं. हास्य–विनोदात वनभोजनाचा कार्यक्रम झाल्यानंतर आपल्या मनास

लागेल त्याप्रमाणें जो तो भोंवतालचें सौंदर्य पहावयास गेला. मालती आणि मधुकर हींहि नदीच्या कांठानें खूप वरपर्यंत गेलीं होतीं. त्या ठिकाणाहून निसर्गशोभा मोठी रम्य आणि आल्हाददायक दिसत होती. एका खडकावर तीं दोघेंहि बसलीं.

" मालती–" मधुकरनें तिच्याकडे पाहात हाक मारली. त्याच्या नेत्रांत मूर्तिमंत आशा सामावली होती.

तिनें त्याच्याकडे फक्त पाहिलें.

" मालती, ज्या आशेचें बीजारोपण तूं माझ्या हृदयवाटिकेंत केलेंस त्या आशालतेवर प्रेमपुष्पें फुलविण्याचे भाग्य मला लाभू देणार नाहींस का ? "

" मधुकर, आपल्या या बोलण्याचा अर्थ नाहीं समजलें मी. "

" यापेक्षा अधिक स्पष्ट करून सांगायला हवेंच का ?–आजपर्यंत माझ्या प्रेमाला सहानुभूति दाखवून तूं जें मला उत्तेजन दिलेंस त्याचें रूपांतर विवाहात नाहीं का होणार ? "

" प्रेम ? आणि असल्या प्रकारचें प्रेम मी आपणावर आजपर्यंत कधीं केलें मधुकर ? "

" मग आपण एकत्र घालविलेला काळ—! "

" परिचय आणि सहवास म्हणजे कांहीं प्रेम नव्हे–हें विसरता मधुकर तुम्ही ? "

" मग आजपर्यंतची तुझी वागणूक—? "

"—निःस्वार्थी अशा मित्रप्रेमाची होती. आपला एक मित्र–सवंगडी या नात्यानेंच मी आजपर्यंत तुमच्याकडे पहात आलें आहे. त्यांत विवाहविषयक प्रेमाचा मुळींच हेतू नव्हता आणि नाहीं. आजकालच्या तरुणांना तरुणींचा सहवास अगर मैत्री म्हणजे प्रेमच वाटतें. " मिस्किलपणानें हंसत मालती म्हणाली.

" माझ्या मागणीचा कांहींच कां विचार करणार नाहींस मालू तूं ? " मधुकरानें तिचा हात आपल्या हातीं घेत म्हटलें.

" खरोखरच मधुकर, मित्रप्रेमासारखें निःस्वार्थी आणि शुद्ध प्रेम या जगांत दुसरें कोणतेंच नाहीं ! आणि–आणि–"

" आणि–आणि काय मालू ? "–मधुकरानें अधिऱ्या मनानें विचारलें.

" आणि–कांहीं नाहीं मधुकर ! मी म्हणत होतें, तुम्ही आपल्याला अनुरूप अशा वधूशीं कां विवाह करीत नाहीं ? "

" पण, मी तुला पसंत नाहीं का ? "

" तसं नव्हे, मधुकर ! पण तुम्ही कितीहि हुशार असलांत, अभ्यासाच्या बाबतींत तुमची मला कितीहि मदत होत असली तरी आमच्या सामाजिक दर्जाकडे मला नको का पहायला ? "

" म्हणजे ? आपल्या प्रेमांत माझी गरिबी आड येते असंच ना तुझं म्हणणं ? "

मालीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्याच्या हातांतून आपला हात मात्र सोडविण्याचा तिनें प्रयत्न केला व हृदयावर घाव बसलेल्या मधुकरानेंहि तो सोडला व त्याबरोबरच एक दीर्घ निःश्वास सोडला.

आणखी थोडा वेळ स्तब्धतेंत गेल्यानंतर मधुकर म्हणाला, " पण मालती, आपल्या भावी उज्ज्वल कालाकडे— "

" मधुकर, तुम्ही हा विचारच सोडून द्या. " मालती अगदीं विषय संपविण्याच्या दृष्टीनें म्हणाली, "सुंदर फूल देवाच्या मस्तकींच वहायचं असतं. "

या बोलण्याचा मधुकरला बराच संताप आला. सौंदर्य आणि संपत्ति याचा ताठा असणाऱ्या मालतीचा त्याला एक प्रकारें तिटकाराच आला आणि तिच्या निवडींत आपण कांहीं चुकत तर नाहीं ना अशीहि एक शंका त्याच्या मनात येऊन गेली. त्या रागाच्या भरांत तो तेथून झटकला आणि मोटारीपाशीं आला. मालतीहि त्याच्या खुळचटपणाबद्दल मनातल्या मनांत हंसत त्याच्या मागून गेली.

मालतीनें आजपर्यंत अनेकांच्या मागणीला हरताळ फासला होता आणि त्याबरोबर तिच्या दृष्टीनें तिच्या सौंदर्याचे चीज करणारा असा तिला कोणीच भेटला नव्हता. किंबहुना विवाह करून परतंत्र आयुष्य कंठणे ही कल्पनाच तिला पटत नव्हती. म्हणूनच तिने आतां ' आपण विवाहच करणार नाहीं ' अशी घोषणा केली होती. कित्येकाची तिने सरळ निराशा केली, तर कित्येकाना तिनें नादान ठरवून त्याचा अपमान केला. तिला आपल्या सौंदर्याचा भारीच गर्व वाटूं लागला होता; आणि याचे कारण म्हणजे तिच्या भोवतालची परिस्थितीच !

* * *

मालती आतां एम् ए. होऊन बी. टी.साठीं मुंबईस गेली होती. मध्यतरीं सहासात वर्षांचा काळ लोटला होता. तिच्या अनियंत्रित वागणुकीमुळे तिच्यात आता बराच बदल झाला होता. पूर्वीचें तिचें ते मादक आणि मोहक सौंदर्य राहिले नव्हते. त्यात आता प्रौढपणाची झाक मारून अकालीच वृपद्धणाची छटा दिसत होती. बऱ्याच वादळानंतर सृष्टि जशी मलूल व्हावी, किवा गुलाबपुष्पाच्या पूर्ण विकसनानंतर त्यावर निस्तेजाची जशी छटा यावी तसे तिच्या सौंदर्याचे झाले होतें; अर्थात् तिच्या भोवतालच्या मधुकरवृत्तीच्या तरुणाचा घोळकाहि कमी झाला होता. यापुढे कोणीतरी आतां जन्माचा सहचर असावा, निरंतरचा स्नेही असावा असें तिला वाटू लागले होते. परंतु तिचे आजपर्यंतचें खरे वर्तन अनेकांशीं झालेली उद्दाम वर्तणूक, आणि तिच्या सौंदर्याची उतरलेली कला या सर्वांमुळे तिला कोणीच मागणी घालावयास धजेनात. मुलीच्या बाबतींत आलेला भलताच अनुभव पाहून तिचे वडीलहि तिच्या विवाहाच्या बाबतींत उदासीन होते; आणि तिलाहि आतां आपलें मन उघड करणें कठीण जाऊं लागले. त्यामुळें तिच्या विवाहाचा प्रश्न लांबतच चालला.

आणखीहि काहीं वर्षे निघून गेलीं. मालती आता बी. टी. होऊन मुलींच्या एका शाळेंत शिक्षकीण झाली होती. तिच्या बहु-सर्व मैत्रिणींचीं लग्नें होऊन त्याचे संसार सुखाचे चालले होते. कित्येकींना मुलेहि होऊन त्या अनुपम सौख्यात त्या दंग झाल्या होत्या. त्याचें तें सौख्य आणि मातृवात्सल्य पाहून तिला कसेसेच होऊं लागले. या भावना ती दडपूं शकत नव्हती. तिच्या मनांत अजूनहि विवाहाचे विचार येतात ! पण—

# अदृश्य जखम !

त्यानें पुन्हां एकदा दारावरील पाटीकडे पाहिलें आणि घंटा दाबली. एकदोन मिनिटाच्या आंतच एका नोकरानें येऊन दार उघडले.

" डॉक्टर आहेत का घरात ? " त्यानें विचारलें.

" आहेत; पण अजून उठले नाहींत. " गड्यानें उत्तर दिले.

त्यानें मनगटावरील घड्याळाकडे एकदां पाहिलें आणि तो पुन्हां म्हणाला, " अच्छा, त्याना जाऊन सांग कीं मी आलों आहे. "

"—पण साहेबानीं सांगितलं आहे कीं, कोणीहि आलं तरी मला उठवूं नका म्हणून. रात्रीं एका ऑपरेशनच्या बाबतींत हॉस्पिटलमध्यें त्याना बराच त्रास झाला आहे. "

" काहीं हरकत नाहीं. त्याची मला आतांच भेट घेतली पाहिजे. आत जाऊन त्याना माझा निरोप सांग. " असें म्हणून त्यानें त्या नोकराला दूर सारलें व आत प्रवेश केला. नोकर बराचसा आश्चर्यचकित झाला व तो थोडासा घोटाळ्यांतहि पडला. त्याची ती निश्चयी, परंतु सहानुभूति निर्माण करणारी मुद्रा पाहून त्याला काय

वाटलें कोणाला ठाऊक, त्यानें त्याला व्हिजिटर्स रूममध्यें बसायला सांगितलें व तो आंत निघून गेला. पांचचार मिनिटांतच परत येऊन डॉक्टर बाहेर येत असल्याचाहि त्यानें निरोप आणला.

त्याचा पोषाख भारी किमतीचा व चेहरा रुबाबदार होता. यावरून सदर व्यक्ति समाजांत प्रतिष्ठित व सुशिक्षित असावी असें दिसत होतें. मात्र सूक्ष्मपणानें पाहणाऱ्याला त्याच्या मुद्रेवरून तो बराच दुःखी–कष्टी असावासें दिसत असे.त्याच्या तोंडावर फिकटपणाची किंचित् झांक मारत होती व मधून मधून तो कण्हतहि असे. रुमालानें हात गळ्यांत अडकविल्यामुळें त्याच्या हाताला कसली तरी दुखापत झाली असावी असें अनुमान काढावयास बरीच जागा होती. त्याचे मन स्थिर नव्हतें. कसली तरी अस्वस्थता–भयंकर अस्वस्थता–त्याला वाटत असावी.

थोडक्याच वेळांत डॉक्टर आपल्या पांढऱ्या झग्यात तेथें आले व त्यानीं सहास्य मुद्रेनें नमस्कार केला. त्यानेंहि उलट नमस्कार करून हंसण्याचा प्रयत्न केला. पण त्याचें तें हास्य त्यालाच वेडावून दाखवीत असल्याचें भासले.

दवाखान्यात त्या दोघाखेरीज तिसरें कोणीहि नव्हतें. डॉक्टरानीं त्याला त्याच्या आगमनाचा हेतु विचारला तेव्हा तो म्हणाला, "गेला सबंध आठवडा मला झोंप कशी ती नाहीं. माझा उजवा हात भयंकर ठणकतोय्. काय झालंय् तें मात्र काहींच सांगता येत नाहीं. काळपुळी अगर असलाच एखादा भयंकर रोग असावा असं वाटतं. सुरवातीला मला तसा कांहींच त्रास झाला नाहीं; पण अलीकडे त्या ठिकाणीं नुसती आग !–आगीचा भडका होतोय् ! एक क्षणभर-देखील बरं वाटत नाहीं. हें असंच चाललं तर मला खात्रीनं वेड लागणार असं वाटू लागलं आहे. अगदीं असह्य होऊन राहिलं आहे. असं वाटतं कीं, त्या जागीं रखरखीत निखारा ठेवावा,

नाहीं तर तें कापून तरी काढावं." असें म्हणून त्यानें आपला हात गळयांतून काढला व कोटाची बाही वर करून ज्या ठिकाणीं ठणका लागला होता ती जागा त्यानें डॉक्टरना दाखविली.

डॉक्टरनीं त्या जागेकडे पाहिलें, पण त्याना तेथे काहीच दिसून आलें नाहीं. त्याना बरेंच आश्चर्य वाटले व या गृहस्थाला वेडबीड तर लागलें नाहीं ना, अशा नजरेनें त्यांनीं त्याच्याकडे पाहिले. तोहि डॉक्टराकडे आशाळभूत दृष्टीनें पाहत होता. त्याच्या मुद्रेवरील प्रामाणिकपणा व कारुण्य पाहून डॉक्टर विस्मयात पडले. ते म्हणाले, "मला तर इथं काहींच दिसत नाहीं; मग ऑपरेशन ते कशावर करायचं ?"

"हें काय? या—या ठिकाणीं भयंकर आग होतेय्." असें म्हणून त्याने दुखत असलेली जागा दाखिविली.

पण त्या ठिकाणीं काय होते? अगदीं काहीं झालेलें नव्हते. कातडीचा रंग देखील बदलला नव्हता. पण त्याला असह्य वेदना होत असाव्यात असे मात्र त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होते. डॉक्टरनीं त्याचा हात आपल्या हातात मोठ्या हळुवारपणे घेतला व त्यानें दाखविलेल्या जागेवर त्यानीं आपलें बोट ठेविले. त्याबरोबर त्यानें आपला हात मागे ओढला. डॉक्टरांच्या बोटाचा स्पर्श होताच तो भाग दुखावल्याचें दिसले. मनगटाच्या मागील बाजूला किंचित् वरच्या भागावर ती जागा होती.

"इथंच दुखतंय्?"

"हं—अगदीं भडका उडालाय्."

"मीं बोट ठेवलं तेव्हा कांहीं दुखल्यासारखं वाटलं का?"

पण त्यानें काहींच उत्तर दिलें नाहीं. त्याच्या डोळयातील अश्रूच त्याच्या दुःखाची कहाणी सागावयास समर्थ होते.

"फारच चमत्कारिक; मला तर कांहींच दिसत नाहीं!"

" मला देखील दिसत नाहीं; पण त्या दुःखाची कल्पना मला आहे. अगदीं जीव नकोसा झाला आहे."

डॉक्टरनीं तो भाग पुन्हां एकदां तपासला. सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनहि त्यानीं पाहिलें. ताप वगैरे आहे का, तेंहि थर्मामिटर लावून पाहिलें. पण रोगाचें निदान त्याना कांहींच होईना.

" कातडी तर अगदींच निरोगी दिसते. शिरा चांगल्या आहेत, अन् सूज बीज काहींच नाहीं. "

" ती जागा किंचित् ताबूस झाल्यासारखी मला दिसते. "

" कुठं ? "

त्यानें जागा दाखविली. पैशाएवढा चट्टा पडला आहे हें दर्शविण्याकरिता त्यानें त्या भागावर पेन्सिलीनें वर्तुळ काढून दाखविलें. " इथं. "

पण डॉक्टरना काहींच उमज पडेना. तथापि ते म्हणाले, " तुम्हाला इथं एक आठवडाभर तरी राहिलं पाहिजे; मग पाहूं आपण, काय करता येईल तें. "

" छे छे ! एक मिनिटभर देखील मला आतां कळ काढवत नाहीं. मी कोणी एखादा वेडा अगर भ्रमिष्ट आहें असं समजूं नका. डॉक्टर, ही अदृश्य जखम मला भयंकर त्रास देतेय् हो. " अगदीं कळवळ्यानें तो म्हणत होता, " कृपा करून तेवढा भाग— अगदीं हाडापर्यंत कापून काढा, म्हणजे मला जरा बरं वाटेल. "

" तसं करण्याची मला काहींच आवश्यकता दिसत नाहीं. "

" डॉक्टर, असे नका हो निष्ठुर होऊं. खरोखरच मी कोणी वेडा नाहीं अगर मी आपली फसवणूक करीत नाहीं. तेवढा भाग कापून काढाच. फार उपकार होतील. " असें म्हणून त्यानें आपला डावा हात कोटाच्या खिशात घातला व पाकिटातून दहाच्या पाच नोटा

काढून त्यानें डॉक्टरांच्या पुढें ठेवल्या व म्हणाला, " हें आपल्या श्रमाचं पारितोषिक. "

" तुम्हीं साऱ्या जगातला पैसा जरी माझ्यापुढं आणून ओतला तरी मी चाकूला स्पर्श करणार नाहीं. कारण ती गोष्ट आमच्या धंद्याला काळिमा आणणारी आहे. सारें जग तुम्हांला मूर्ख ठरवील आणि मला रोगाचं निदान कळलं नाहीं म्हणून माझी छीः थूः होईल. "

" बरं तर; माझ्यावर एवढी तरी दया कराल का? मी माझ्या हातानं तो भाग कापून काढतों आणि नंतर त्या जखमेवर आपण औषधोपचार करा. "

डॉक्टरांच्या उत्तराची वाटहि न पाहतां त्यानें शर्टची बाही वर केली व दुसरें कांहींच शस्त्र नसल्यामुळें त्यानें आपल्या खिशांतील चाकू काढून तो त्या जागीं चटकन् खुपसला !

हें पाहतांच डॉक्टर उद्गारले, " हं हं, हे काय? थांबा—थाबा जरा ! शीर बीर कापली गेली तर भलतंच होईल ! "

इतकें झाल्यानंतर डॉक्टरना त्या भागावर ऑपरेशन करणें भागच झालें. त्यानीं झटकन् सर्व तयारी केली व त्याला टेबलावर निजावयास सांगितलें. पण तो म्हणाला, " तसं नको; मी आपणाला दाखवतों, किती भाग कापला पाहिजे तो."

तो भाग कापला जाताना त्यानें हूं कीं चूं केलें नाहीं. मात्र तो कापून झाल्यानंतर कांहीं तरी डोक्यावरील जड ओझें उतरून ठेवल्याप्रमाणे त्यानें समाधानाचा एक सुस्कारा सोडला.

" आता कसं वाटतं ? " डॉक्टरनीं विचारलें.

" फारच छान " त्यानें हंसत उत्तर दिलें, " कापल्यामुळें किंचित् चुणचुण होते. पण होषारी आग नाहींशी होऊन जरा गार वाटूं लागलं आहे. हं. आतांच बांधूं नका. जाऊंदे जरा रक्त. "

जखम बांधल्यानंतर त्याच्या मुद्रेवर बरेच समाधान दिसूं लागलें. त्याच्यात मनस्वी बदल झाल्यासारखें दिसलें. "मी आपला अत्यंत ऋणी आहें, डॉक्टर !" कृतज्ञतेनें त्याचें अंतःकरण भरून आले होते.

जखम पूर्णपणे भरून आल्यानंतर तो आपल्या गावीं परत निघून गेला.

* * *

एक महिन्यानंतर तो पुन्हा डॉक्टरकडे आला. अगदीं पहिल्या-प्रमाणे त्याची अवस्था झालेली दिसत होती. इतकेंच नव्हे, तर या खेपेला त्याच्या शरीरांतहि कांहीं त्राण उरले नाहीं असें दिसत होतें. त्यानें आपला हात डॉक्टराच्या पुढे केला.

"काय झालं पुन्हा ?"

"मागच्या खेपेला आपण बरोबर तो भाग कापला नाहीं. पुन्हा दुखूं लागला आहे. नव्हे, अगदीं कठीण अवस्था झाली आहे. आपणाला पुन्हा एकदा ऑपरेशन केलं पाहिजे." दुःखानें त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर निघत नव्हता.

डॉक्टरनीं पुन्हा तपासले. मागील जखम पूर्ण भरून कातडीहि नवीन आली होती. नाडी ठीक चालली होती. ताप भरला नव्हता; पण तो सारखा थरथर कांपत होता.

"असली केस मी यापूर्वी कधींच पाहिली नव्हती !" डॉक्टर स्वतःशीं म्हणाले.

पुन्हा ऑपरेशन करण्याखेरीज गत्यंतरच नव्हतं. ऑपरेशननंतर त्याला बरें वाटलें; पण या खेपेला तो कांहीं हंसला नाहीं. उलट डॉक्टरांचे आभार मानतांना तो बराच थकलेलाहि दिसला. जखम बांधून झाल्यावर तो निघून गेला.

या केससंबंधीं डॉक्टरनीं आपल्या बऱ्याच डॉक्टर-स्नेह्यांना विचारलें; पण असली चमत्कारिक केस कोणाच्या पाहण्यात आली नव्हती. म्हणून कोणालाच समाधानकारक उत्तर देता आलें नाहीं.

आणखी एक महिना गेला तरी तो पुन्हा काहीं आला नाहीं. पण त्याच्याकडून डॉक्टरना एक पत्र आलें. त्यांना वाटलें कीं, बहुतेक त्याचा तो रोग बरा होऊन त्यासंबंधींच त्यानें आभार-प्रदर्शक पत्र पाठविलें असेल. त्यानांहि समाधान वाटलें व त्या आनंदांतच त्यांनीं तें फोडलें. पत्र पुढीलप्रमाणें होतें—

"प्रिय डॉक्टर,

माझ्या दुःखाचा उगम कशात आहे या बाबतींत मी आपलें शंकानिरसन करणार आहें. या जगात मी आता फार काळ राहणार नसल्यामुळे त्यासंबधींची गुप्तता राखण्याचें मला काहींच कारण नाहीं. आणि म्हणूनच माझ्या त्या प्राणांतिक वेदना होणाऱ्या दुःखांचें कारण सांगणार आहें. तीन वेळा ती जखम उद्‌भवली, आणि यापुढें तिच्याशीं झगडण्याचें सामर्थ्य आता माझ्यात उरलें नाहीं. आजचें हें पत्र मी त्या जखमेवर जळजळीत निखारा ठेवूनच लिहीत आहें. जखमेतील धग इतकी आहे कीं, तीपुढें या निखाऱ्याची धग कांहींच नाहीं.

"सहा महिन्यापूर्वी माझ्यासारखा सुखी प्राणी कोणीच नव्हता. वाडवडिलार्जित भरपूर इस्टेट, सुखाचीं सर्व साधनें हाताशीं, तरुण वय—कशाला म्हणून कमतरता नव्हती. मीं गेल्याच वर्षी लग्न केलें —आणि तेंहि प्रीतिविवाह. मग माझ्या आनंदाला पारावार कोठून असणार! भरपूर संपत्ति आणि सुस्वरूप पत्नी यापेक्षा अधिक सुखाची तरी कोणाला अपेक्षा असणार! सहा महिन्याचा काळ कसा गेला तो आम्हाला समजलादेखील नाहीं. तारुण्यसुलभ शृंगार, विनोद, गप्पा-गोष्टी, हसणें, खिदळणें, फिरणें, मजा करणें यापेक्षा अधिक तें

आम्हांला काय सुचणार? खरोखर तिचें लावण्य अप्रतिम, स्वभाव अति गोड, वागणुक मनपसंत–अजूनहि ती अल्लड बालिकाच होती. पण आमचें हें सौख्य दैवाला फार दिवस पाहवलें नाहीं.

" तिचे कपडे, दागिने, शिवण व वीणकाम वगैरे ठेवण्यासाठीं तिनें एक कपाट मागून घेतलें होतें. पण त्या कपाटाच्या एका खणाला ती नेहमीं कुलूप लावी व त्याची काळजी घेई. सुरुवातीला मला त्यात विशेष काहींच वाटलें नाहीं. पण नंतर ती गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली. त्या खणात तिचें एवढें काय रहस्य असावें कीं, जें मलादेखील कळूं नये, याची तिने काळजी घ्यावी? त्याच वेळीं संशयपिशाचानें मला पछाडलें. तिच्या त्या निष्पाप दृष्टीवर माझा विश्वास बसना. कांहीं तरी पाणी मुरत असावें अशीच माझी समजूत झाली. तिचें तें प्रेमळ वर्तन मला फसविण्याकरितां तर नसावें ना, असाच माझा ग्रह झाला.

" एके दिवशी ती आपल्या मैत्रिणीकडे गेली असता त्या संधीचा फायदा घेऊन मी तिच्या कपाटाला किल्ली चालवून तें उघडलें व एका सुंदरशा गुलाबी फितींत गुडाळलेले पत्राचें पुडकें बाहेर काढले. माझा पूर्वीचाच संशय दुणावला. कारण तीं सारीं प्रेमपत्रेच होतीं.

" माझ्या पत्नीचें माझ्यावर इतकें प्रेम होतें कीं–निदान ती वरून तरी तसें दाखवीत असें–तिच्या पूर्वायुष्याच्या खाजगी गोष्टीं-कडे मला लक्ष देण्याचें काहींच कारण नव्हतें. पण त्या वेळीं माझी सद्सद्विवेकबुद्धिच जाग्यावर नसल्याकारणानें त्या पत्रांतील मजकूर वाचण्याची माझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाली. मीं तीं सारीं पत्रें एकामागून एक वाचून काढलीं.

" माझ्या आयुष्यातील ती वेळ अगदीं भयंकर अशीच होती.

" तीं पत्रें दुसऱ्या कोणाचीं नसून माझ्या एका जिवलग स्नेह्या

नेंच लिहिलीं होतीं. पत्रावरील मायना प्रेमानें पूर्ण भरलेला व आंतील मजकूरहि प्रेमाची महति वर्णन करणाराच होता. पत्रें कोणाला पाठविलीं हे कळण्यास मार्ग नसला, तरी तीं सारीं आमच्या लग्नानंतरच लिहिलेलीं आहेत हें त्यावरील तारखांवरून स्पष्टच होत होते; आणि मी मात्र स्वतःला अगदीं पूर्ण सुखी समजत होतो. त्यावेळच्या माझ्या भावनांचें वर्णन या ठिकाणीं मला करता येत नाहीं. मी तीं सारीं पत्रें पुन्हा जशींच्या तशीं आत ठेवून दिलीं व तिच्या येण्याची वाट पाहत बसलों.

" ती आली, तरी मी कांहींच बोललों नाहीं. रात्रींचीं जेवणें झाल्यानंतर नेहमींप्रमाणें आम्हीं निजावयास गेलों. तिच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें तिचा थट्टाविनोद चालू होता. पण माझ्या अंतःकरणांत कोण खळबळ उडाली होती ! तिची ही आताची वागणूक प्रेमळपणा दाखवीत होती. पण तिची प्रेमपत्रें माझ्याशीं प्रतारणा करीत होतीं. स्त्रियाना किती बेमालुम सोंग आणता येतें आणि उदारहृदयी पुरुषाना कसें फसवितां येतें, त्याचें दृश्य मी माझ्या नजरेनें पाहात होतों. स्त्रिया इतक्या निमकहराम असतात तर...

" तिला लवकरच झोंप लागली; पण मला लागणे शक्य नव्हतें. मध्यरात्रीचा सुमार झाला होता. मी पांघरूण दूर सारलें व उठून बसलों आणि तिच्या मुखाकडे पाहिलें. दिव्याचा मंद प्रकाश तिच्या तोंडावर पडला होता. किती सुंदर, किती निर्मळ, किती निर्व्याज दिसत होतें ते मुखमंडल ! त्याच वेळीं ती स्वप्नांत हंसली. माझा संताप अनिवार झाला. स्वप्नांत देखील प्रियकराशीं प्रेमचेष्टा चालल्या असाव्यात असाच मला भास झाला. सैतानानें माझ्या मनात चांगलाच धुमाकूळ माजविला ! मी स्वतःचें भान विसरलों आणि—आणि त्या क्षणींच तिचा गळा दाबून...तें सुंदर पुष्प मी माझ्या हातानें चुरडलें. तिने कांहींच हालचाल केली नाहीं. मात्र

तिच्या तोंडांतून आलेल्या रक्ताचा एक थेंब माझ्या हातावर पडला—आपणाला ती जागा माहित आहेच. त्या वेळीं ते मला कळले नाहीं; पण दुसऱ्या दिवशीं तो थेंब पूर्णपणे वाळल्यानंतर माझ्या लक्षांत आलें...मला माझ्या त्या दुष्कृत्याचें काहीच वाटलें नाहीं; कारण तिला योग्य तेंच शासन मिळाले होते, अशीच माझी भावना होती.

"त्यानंतर पंधराच दिवसानीं तिची मैत्रीण माझ्याकडे आली व माझ्या पत्नीच्या अचानक मृत्यूबद्दल दुःख व्यक्त करून माझ्या मनाचें तिनें सात्वन केलें. पण माझे त्याकडे लक्ष नव्हते. कारण माझें सात्वन करण्याची कांहींच आवश्यकता नव्हती. थोड्या वेळानंतर तिने माझ्या पत्नीजवळ एक पत्राचें पुडके दिल्याचे सागितले. घरात कोणाला कळूं नये म्हणून ते तिनें माझ्या पत्नीजवळ ठेवावयास दिल्याचें तिने सागितले. तें ऐकताच माझ्या शरीरातील सारे रक्त गोठत आहे असे मला वाटूं लागले. एकूण तीं पत्रे माझ्या पत्नीचीं नव्हतीं तर ! माझ्या हृदयांत भयंकर कालवाकालव सुरू झाली. मी अगदीं मोठ्यानें रडण्याच्या बेतात आलो व तीं पत्र आणून देण्याच्या निमित्तानें आत जाऊन मी माझ्या मृत पत्नीच्या फोटोसमोर गुडघे टेकून अश्रुविमोचन करूं लागलो. मला माझ्या कृत्याचा आता पश्चात्ताप होऊं लागला. मी माझ्यावरच खूप संतापलों, पण त्याला काय उपाय होता ? पत्राचे पुडके मी माझ्या पत्नीच्या मैत्रिणीजवळ दिले. जाता जाता ती म्हणाली, "खरोखर आपली पत्नी फारच विश्वासू. तिनें या पत्रात काय आहे हें कधीं उघडून देखील पाहिलं नाहीं." व पुन्हा एकदा तिनें मला शोक आवरावयास सांगून साश्रुनयनानीं माझ्याकडे पहात तिने माझा निरोप घेतला.

"त्यापूर्वी माझ्या पत्नीबद्दल मला शोक वाटत नव्हता; परंतु

तिचा जाणून बुजून मींच खून केला हें कळल्यानंतर तिच्यावरील पूर्वप्रेमानें माझ्या मनाची अवस्था शोचनीय झाली.

"माझ्या पत्नीच्या मृत्यूनंतर बरोबर एक महिन्यानें माझ्या हाताच्या ज्या भागावर तो रक्ताचा थेंब पडला होता, त्या भागावर एक तांबूस डाग उमटला आणि त्यानंतरचें आपणास सर्व कांहीं माहित आहेच. यापुढें मला आतां तें दुःख सहन होत नाहीं. माझ्या उतावळ्या स्वभावामुळें माझ्या हातून जें क्रौर्य घडलें, त्याला ती शिक्षाच मिळाली. इतःपर या दुःखाशीं झगडण्याची माझी तयारी नाहीं. मला माझ्या मृत पत्नीची भेट घेण्याची अत्यंत उत्कंठा लागून राहिली आहे. तिला प्रेमानें कडकडून भेटून तिची केव्हा क्षमा मागेन असें मला झालें आहे. ती मला खात्रीनें क्षमा करील. कारण तिचें माझ्यावर तसेंच प्रेम होतें. असो.

"डॉक्टर, हें पत्र आपल्या हातीं पडेल त्या वेळीं स्वर्गात मी माझ्या लाडकीच्या कोमल करपाशात असेन; पण त्यापूर्वी आपण माझ्याकरिता जे जें कांहीं केलें, त्याबद्दल मी आपले मनापासून आभार मानतो."

---

# पहिलें प्रेम !

भटवाडींतील ' शांतानिवास 'मधून ती अगदीं ठराविक वेळेस शाळेंत जावयास निघत असे. कांहीं विशेष कारणाशिवाय तिच्या या नियमितपणात कधींच खड पडला नाहीं. अगदीं ठराविक वेळ, ठराविक मार्ग आणि ठराविक बाजूनें हातांतील पुस्तकें सावरीत ती जाई. कधीं कधीं वाटेत तिच्या वर्गांतील एखाद–दुसरी मैत्रीण तिला भेटे आणि मग तिच्याशीं गप्पा–विनोद करीत ती ठाकुरद्वार–गिरगांव रस्त्यावरील एका गल्लींतील शाळेंत शिरे. पण, पुष्कळदा ती एकटीच असे. त्याच वेळेला अनेक मुली त्याच रस्त्यानें आपआपल्या शाळेंत जात असत. वास्तविक त्या मीनाबाजारात तिच्याकडे विशेष लक्ष वेधण्यासारखें अलौकिक सौंदर्य तिच्याजवळ नव्हतें. चारचौघींसारखीच तीहि होती. पण, तिनें तारुण्यांत नुकताच प्रवेश केला असल्याकारणानें आणि सौंदर्यप्रसाधनांच्या साहाय्यानें, तिनें आपल्या मूळच्या श्यामल वर्णाला विशेष आकर्षकपणा आणला होता; त्यामुळें, तिच्याकडे लक्ष जातांच तिच्या रेखीव सौंदर्याची प्रचीति

येई. विशेषतः तिचें तें तरतरीत नाक आणि पाणीदार हंसरे डोळे प्रामुख्यानें नजरेंत भरत. विविधरंगी तलम पातळानें आपले कांहींसें कृशांग चापून—चोपून नटविल्याकारणानें तिचें बाधेसूद शरीर विशेषच मोहक दिसे. गुलाबाचें मादक आणि उन्माददायक सौंदर्य तिच्यापाशीं नसले, तरी कृष्णकमलाची नाजूक आकर्षता मात्र तिच्यांत खात्रीनें होती.

—आणि म्हणूनच गिरगावनाक्यावरील एका तरुणाच्या ती विशेष नजरेत भरली. तिने त्याचें मन मोहून टाकले. अगदीं ठराविक वेळेला लोकल गाड्या स्टेशनवर येत असूनहि प्लॅट-फॉर्मवरील उतारू ज्याप्रमाणे गाडीच्या वाटेकडे दूरवर अधिऱ्या नजरेनें वाट पाहत असतात, त्याचप्रमाणे तिचीहि शाळेत जाण्याची ठराविक वेळ असतानाहि तो तिची मोठ्या आतुरतेनें वाट पाही. ती येत असलेली पाहताच तो तिच्याकडे रोखून पाही आणि त्याच्या निवासस्थानापाशीं ती येतांच तो चटकन् आंत होई आणि काचेच्या खिडकीआड उभा राहून तो तिच्याकडे अनिमिष नेत्रानीं पाही. तिच्याकडे पाहत असताना त्याच्या हृदयात आनंदाच्या प्रचंड लाटा उसळत. भरतीच्या वेळीं रेक्लेमेशनवरील धक्क्यावर ज्याप्रमाणें समुद्राच्या लाटा जोराने येऊन आदळतात आणि त्यांचे तुषार रस्त्यावर उडून जाणाऱ्या-येणाऱ्याचा गोंधळ उडवितात, अगदीं त्याचप्रमाणें ती त्याच्या दारावरून जाऊं लागली म्हणजे त्याच्याहि हृदयसागरात अशाच प्रेमाच्या लाटा उसळून त्याचे तुषार एका विशिष्ट चमकेच्या रूपानें त्याच्या नेत्रावाटे बाहेर पडल्याचा भास होई. ती त्याच्या नजरेसमोरून एकदांची निघून गेली म्हणजे स्टेशनवरून लोकल निघून गेल्यानंतर स्टेशनला जी अवकळा येत असते तसें त्याच्या मनाचें होई. नाहीं म्हणावयास धावत पळत येऊनहि गाडी चुकलेला उतारू ज्याप्रमाणें निराश मनानें उगीचच

प्लॅटफॉर्मवर फेऱ्या घालीत असतो त्याचप्रमाणें तिचें स्मृति सौंदर्यहि मग त्याच्या मनात असेच रेंगाळत राही व मग काही वेळ तरी तो अगदीं बेचैन होऊन जाई.

पण हें असें किती दिवस चालणार ? तिच्याशीं ओळख कशी करून घ्यावी, तिच्याशीं बोलावयास कशी सुरुवात करावी, तिच्या-पाशीं आपलें मन कसे उघडें करावें याचाच त्याला अगदीं ध्यास लागून राहिला. त्याने आपल्याकडून होईल तितका खूप खूप विचार केला, पण त्याच्या त्या इवल्याशा मेंदूतून त्याला काहींच उपाय शोधून काढता येईना. त्याची अस्वस्थता दिवसेंदिवस वाढतच चालली. त्याचें कशाकडेच लक्ष लागेना, आणि ज्या वेळीं त्याला उपाय सापडला, त्यावेळीं त्याचें त्यालाच कमालीचें कौतुक वाटले आणि आपण जर अधिक शिकलों असतों तर आपण खात्रीनें वकील नाहीं तर बॅरिस्टर झालों असतो याची त्याला खात्री पटली आणि मग त्या विचारानें त्याचे त्यालाच हसूं आलें अन् कमालीचें समाधानहि वाटले.

* * *

आणखी काहीं दिवसानंतर.

त्या दिवशीं त्यानें स्वतःला खूपच नटविलें. भट्टींतून आणलेला पांढरा स्वच्छ शर्ट आणि इस्त्रीचा भोगळ चोळणा चढविला. आकर्षक डिझाइनचा हॅनावा कापडाचा कोट अंगांत घातला. डोक्या-वरचे लांबसडक केस त्याने ब्रिलिअंटाइन चोपडून व्यवस्थित वळविले. कोटाच्या वरच्या खिशात एक अडीच आणे किंमतीचा इमिटेशन सिल्कचा हातरुमाल घडी घालून तो बाहेर दिसेल अशा झोकांत ठेवून दिला, आणि तिच्या येण्याच्या रस्त्याकडे डोळे लावून बाहेरच्या बाजूस उभा राहिला. त्याने मनगटावरील घड्याळाकडे पाहिलें. आत्तासे कुठें साडे नऊ झालेले पाहून तो मनांतल्या मनांत

खूप चरफडला. त्याला वाटलें, आपलें घड्याळ बंद पडलें असावें म्हणून त्यानें तें कानापाशीं नेऊन पाहिलें; पण तें प्रामाणिक-पणानें आपलें काम करीत होते आणि मग त्याला अधिकच राग आला. या वेळीं तें खरोखरच बंद पडलें असतें तर त्याला मनांतून खास आनंदच वाटला असता, पण तेवढें त्याचें नशीब बलवत्तर नव्हतें. त्यानें उगीचच आंत डोकावून भिंतीवरच्या घड्या-ळांकडे नजर फेकली; पण, त्यातील समातर काट्यांकडे पाहून तर तो अधिकच चरफडला. सव्वा नऊ! त्याला वाटलें, घ्यावा एक दगड आणि मारावा फेकून घड्याळावर! पण तसें करणें धोक्याचें होतें. म्हणून त्यानें त्याकडे एक तिरस्कारपूर्ण दृष्टिक्षेप टाकून आपला संताप व्यक्त केला. त्याला वाटलें आपल्या हृदया-तील ठोके ज्या जलद गतीनें पडत आहेत त्याच गतीनें या घड्याळाचेहि ठोके पडले असते तर एव्हाना नसते का साडेदहा झाले! पण त्याला काय माहित कीं, माणसाचें हृदय आणि घड्याळ हीं एकाच मालमसाल्याचीं केलेलीं नाहींत! अधीऱ्या मनानें तो एकसारखा आतबाहेर करीत होता. त्याचें चित्त ठिकाणावर नव्हतें. "काय, कोंडिबा आज विशेष नटलायस्?" म्हणून त्याला उद्देशून कोणी तरी मिस्किलपणाने म्हटलेलेंहि त्याला ऐकू गेले नाहीं. तो आपल्याच नादांत होता.

—आणि ज्या वेळीं भिंतीवरच्या घड्याळांत टोला पडला त्या वेळीं तो किती तरी मोठ्यानें दचकला; त्याला वाटलें आपल्या हृदयावरच कसला तरी आघात झाला आणि म्हणून त्याचा डावा हात अभावितपणें त्याच्या हृदयाकडे गेला. पण त्याला लागलीच समजून आलें कीं, साडेदहाचा हा टोला पडला असून आपण इतका वेळ जिची इतकी आतुरतेनें वाट पहात आहोत ती येण्याची वेळ झाली आहे; म्हणून तो ट्राम, मोटारी, माणसाची गर्दी, बसेस

याना चुकवून तिच्या वाटेकडे डोळे विस्फारून पाहू लागला; पण त्याला हवे असलेले ' माणूस ' त्याला दिसेना. जसजसा घड्याळाचा काटा पुढें पुढें सरकू लागला, तसतसा त्याच्या हृदयाचा ताणहि वाढूं लागला. त्याच्या मनात नाहीं नाहीं ते विचार येऊं लागले. त्याला वाटले आजच नेमका तिला ताप–बिप तर आला नसेल ना ? का एखादा अपघात होऊन त्यांत–पण माणसाचें मनच असं असते कीं, विचाराची मर्यादा खुटली कीं, त्याला त्यापलीकडे जाववतच नाहीं. त्याचेहि तसेच झालें. पाच मिनिटें गेलीं, दहा गेलीं, पण ती त्याच्या दृष्टीस पडेना. मनाला काहीं तरी विरंगुळा म्हणून तो आत गेला व त्यानें मोठ्या थोरल्या आरशात उगीचच डोकावून पाहिलें. घोटून केलेल्या दाढी मिशाचा सफा कट, डोक्यावरचे तुळतुळीत केस, रेखीव भाग, ते त्याचे रुबाबदार कपडे–त्याहि अवस्थेत त्याला स्वतःकडे पाहून समाधान वाटलें. त्याच्या चेहऱ्यावर हास्यरेषा उमटली. त्यानें हातांत कंगवा घेतला आणि नाजुक हाताने तो आपल्या केसावरून फिरवला. कोटावरची शर्टची कॉलर नीट सावरली. वरच्या खिशातला रुमाल किंचित्सा वर ओढला आणि पुन्हा एकदां मुरडून आरशात पाहत तो बाहेर आला.

—आणि आनंदाची एक प्रचंड लाट त्याच्या मनात उसळली. ती भराभर पावलें टाकीत शाळेचा मार्ग आक्रमीत होती. तो चटकन् आत आला व त्याने तेथे एका बाकावर बाजूस ठेवलेलीं पुस्तकें व जाडशी वही उचलली आणि तिचा पाठलाग सुरू केला. ठाकुरद्वारच्या नाक्यापर्यंत तीं दोघेहि अगदी शेजारूनच जात होतीं. त्याच्या त्या भपकेबाज पोशाखामुळे म्हणा अथवा त्यावरील अत्तराच्या सुगंधामुळे म्हणा तशा त्या शाळा–बाईतहि तिचें त्याच्याकडे लक्ष वेधलें, आणि क्षणार्धांत तिनें त्याचे आपादमस्तक निरी-

क्षण केले. कोणत्याहि तरुणीचें मन आकर्षून घेईल असाच आजचा त्याचा जामानिमा होता. वाटेंत तिनें त्याच्याकडे किती तरी वेळां मुरडून पाहिलें असेल व तेवढ्या वेळांत तिची चालण्याची गतीहि मंदावली असेल. तिला एकदा तर वाटलें कीं, तो तरुण आपणांकडे पाहून हंसलाहि असावा; पण तो केवळ भासच होता. कारण तो कोणी सोकावलेला सोकाजीराव नव्हता. त्याच्याहि आयुष्यांतील हा पहिलाच समरप्रसंग होता, आणि पहिल्या चकमकीच्या वेळीं दोन्ही पक्ष प्रतिपक्षाचे बळ अजमावण्याचाच प्रथम प्रयत्न करीत असतात. त्याचेंहि तसेंच होतें. ठाकुरद्वार नाक्याजवळच्या गिरगाव रस्त्यावरील एका गल्लींत शिरत असताना तिने मागें वळून त्याच्याकडे पाहिले. तोहि आपणाकडेच पाहतो आहे हें पाहताच तिनें लाजून मान खालीं घातली आणि भराभर पावलें टाकीत ती शाळेच्या इमारतीकडे निघून गेली.

* * *

ध्येयसिद्धीसाठीं शेकडो–हजारो वर्षें तपश्चर्या करण्याची प्राचीन ऋषींना आवश्यकता भासली असली तरी, त्याला मात्र त्या दिव्यांतून जावें लागलें नाहीं. हळूहळू त्या दोघांची ओळख झाली. तीं दोघेंहि अगदीं ठराविक वेळेला ठाकुरद्वार–गिरगाव रस्त्यानें जात असत. अगदीं आपली नेमक्या जागीं व नेमक्या वेळेला गाठ कशी पडते याचें तिच्या चेहऱ्यावर आश्चर्य प्रगट होई. तोहि तेंच आश्चर्य व्यक्त करण्याचा प्रयत्न करी; पण प्रत्यक्ष बोलण्याचें धैर्य मात्र कोणालाच होत नसे. तथापि जगात आश्चर्यकारक गोष्टी थोड्या का घडून येत असतात? मग त्याच्या बाबतींत तरी त्या घडून का येऊ नयेत? आणि झालेंहि तसेंच. एके दिवशीं समोरून येणाऱ्या एका लठ्ठशा कोळणीचा तिला धक्का लागला आणि तिच्या हातातील पुस्तकाची चवड रस्त्यावर पडली. तो शेजारून

जात होता. त्याला ती संधि बहुमोल वाटली. तो चटकन् खालीं वांकला. सारीं पुस्तकें गोळा करून त्यानें तिच्या हातीं दिलीं. त्या गडबडींत तिच्या बोटांचा त्याच्या बोटांना स्पर्श झाला. त्या दोघांनाहि काय व्हायचें तें झालें ! तिनें त्याचे कसेबसे आभार मानले. त्यानें फक्त हंसून तिला उत्तर दिलें.

थोडेसें पुढें गेल्यानंतर—

" कुठें कॉलेजात असतां वाटतं ?"—ती

" हो. "—तो.

पुढे सर्वच मुक्यांचा बाजार ! पुढें काय बोलावें हें दोघांनाहि समजेना. अंतःकरणांत तुफान उठलें म्हणजे जीभ लुली पडते-असं कायसंसं म्हणतात ना—अगदीं तसं त्याचं झालं होतं. त्याच्या प्रेमाचा हा कुठें श्रीगणेशा होता.

पण श्रीगणेशा असला म्हणून तो किती दिवस घटवीत बसणार ? यथाकाल त्यांनीं आपल्या प्रेमाचीं धुळाक्षरें गिरविलीं आणि तीं आतां प्रत्यक्ष प्रेमपाठ घोकीत होतीं.

शाळा सुटल्यानंतर तीं दोघे चौपाटीवर, नाहीं तर रेक्लेमेशनवर जाऊन बसूं लागलीं. कधींमधीं हॅंगिंग गार्डनचा चढाव चढून जाण्यापर्यंतहि त्यांची मजल जाऊं लागली.

पण, हें असे किती दिवस चालणार ? चोरट्या प्रेमाची खुमारी काहीं और असली तरी त्याचाहि कधींना कधीं वीट येतोच; पण पुढची मजल मारण्याचें मात्र अद्यापि कोणालाच धैर्य होत नव्हतें.

*　　*　　*

दिवसामागून दिवस जात होते.

एके दिवशीं—

त्याच्या ध्यानींमनींहि नसतां एका व्यक्तीने त्याना पाहिलें. तिला मोठेंच आश्चर्य वाटलें. पण तेवढ्यातच ठाकुरद्वारच्या नाक्या-

वरून म्यूझियमकडे जाणारी १०-५० ची ट्राम सुटल्याकारणानें तिला त्यांच्याकडे अधिक लक्ष देतां आलें नाहीं. दुसरे दिवशीं ती व्यक्ति जरा लवकरच येऊन 'सन शाईन'च्या नाक्यावर येऊन उभी राहिली. अपेक्षेप्रमाणें तीं दोघेंहि ताब्यांच्या हॉटेलपुढून हंसत गप्पा मारीत येत होतीं. पण ती वेळ ओळख देण्याची नव्हती. नाहीं तर केवळ अस्तित्वानें देखील एखादवेळेस तीं पाखरें उडून जायचीं!

त्याच दिवशीं ऑफिसातून सुटल्याबरोबर ती व्यक्ति भटवाडींतील शाता-निवासमधील चोवीस नंबरच्या खोलींत शिरली. आंत जातां जाता, "आहेत का रामभाऊ घरांत?" म्हणून तिने परवलीचे शब्द उच्चारले. हातात पोह्याची बशी धरूनच रामभाऊ बाहेर आले.

"कोण? हणमंतराव? या! बरेच दिवसानीं फिरकलात?- अग, ए, हणमंतराव आले आहेत-त्यांच्यासाठीं एका बशींत पोहे पाठवून दे पाहूं-अन् फक्कडसा चहा ठेव स्टोवर?-हं, काय हणमंतराव! आज इकडे कुठें चुकून आलांत?"

पण, रामभाऊंच्या या प्रश्नाला सरळ उत्तर देण्याऐवजीं हणमंतरावानीं चौफेर नजर फिरवीत विचारलें, "पमी कुठें दिसत नाहीं ती!"

"आली नाहीं अजून शाळेंतून!"

"म्हणजे? सहा वाजले तरी अजून शाळेंतून आली नाहीं म्हणजे काय?"

"काय म्हणे हल्लीं तिच्या शाळेत कुठल्याशा प्रदर्शनासाठीं हस्त-व्यवसाचीं कामं चाललीं आहेत अन् तुम्हांला माहीतच आहे आमच्या पमीची हस्तकला!" असे म्हणून रामभाऊ मनसोक्त हंसले.

पण, हणमंतरावाच्या चेहऱ्यावरील आश्चर्य काहीच कमी झालं नाहीं. बाळूने आणून दिलेली पोह्यांची बशी हातीं घेत हणमंतराव

म्हणाले, " पमीची अन् कुठल्याशा एका तरुणाची ओळख असलेली तरी तुमच्या कानीं आहे का ? "

" नाहीं बुवा ! तशी तिची कोणाशींच ओळख नाहीं–नि ओळखी करून घेण्यासारखा तिचा स्वभावहि नाहीं ! का ? तुम्हाला तशी कांहीं शंका आलीय् कीं काय ? "

" मीं आज तसे काहीं प्रत्यक्षच पाहिले म्हणून विचारतों. "

" माझ्या काहींच कानांवर नाहीं. विचारतों तिला मी घरीं आल्यावर. "

" छे! छे! एकदम तिला तसं काहीं विचारूं नका. थोडं दमानंच घ्या. मीच काहीं तरी चुकत नसेन कशावरून ? तेव्हा असं करा. उद्या तुम्ही स्वतःच पहा तो तरुण तुमच्या माहितींतला आहे कीं काय तो–अन् मग विचारलेलं बरं. कदाचित् तो तुमच्या नात्यातलाहि असावा. तुम्हीच पाहून काय तें ठरवा. "

रामभाऊंना तो सल्ला पटला व दुसरे दिवशीं ते नेहमींप्रमाणे ऑपेरा हाऊसजवळच्या आठ नंबरच्या ट्राममध्यें न बसता हणमंतरावाबरोबर ठाकुरद्वारच्या नाक्यावर आले व सन शाईनमध्ये बसून दोन 'पावणे' मागवून–ती चहाची वेळ नसतांनाहि–चहा पीत बसले.

अगदीं ठराविक वेळेला पमी आणि तिचा 'तो' त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून रामभाऊंना विजेचा धक्का बसल्याप्रमाणे झाले.

" पमीची–अन् याच्याशीं ओळख ? " रामभाऊंच्या मुखातून आश्चर्योद्गार उमटले.

" का ? कोण आहे तो ?" हणमंतरावानीं पृच्छा केली. रामभाऊंनीं त्याची माहिती सांगितली. त्यांनाहि तसाच विजेचा झटका बसला.

पमीच्या या प्रेमचाळ्यांना पाहून रामभाऊ खूपच संतापले; पण हणमंतरावांनीं त्यांना उगीचच आततायीपणा न करण्याबद्दल

इशारा दिला. रामभाऊनांहि त्यांचें म्हणणें पटलें व मग ट्राममध्यें बसल्यावर त्यांनीं कांहीं एक विचार नक्की ठरविला आणि त्याप्रमाणेंच घडवून आणण्याचें ठरविलें.

* * *

त्याच दिवशीं रात्रीं—

पमी काहीं तरी लिहीत टेबलाशीं बसली होती. रामभाऊ सकाळच्या 'टाईम्स' उगीचच चाळीत होते. विषयाला कसा हात घालायचा याचा ते विचार करीत असावेत. शेवटीं त्यानीं पमीच्या अभ्यासापासूनच सुरवात करण्याचें ठरविलें.

" काय पमाताई, हल्लीं अभ्यास जोरांत चालला आहे ना ? "

" हो तर ! सहामाही परीक्षा जवळ आली आहे ना ? "

रामभाऊ मनातल्या मनात हंसले व मग किंचित् थाबून आठवल्यासारखे करीत त्यानीं विचारले—" काय ग पमाताई, हल्लीं तुझ्याबरोबर कोण ग तो तरुण असतो ? मला आपले ते हे म्हणत होते कीं, तुम्ही हल्लीं दोघं बरेच वेळा एकत्र दिसता म्हणून ! "

रामभाऊंचा हा अनपेक्षित प्रश्न ऐकून पमी केवढ्यानें तरी दचकली. तिच्या हातातून टाक गळून पडला व भयभीत मुद्रेनें ती त्याच्याकडे पाहूं लागली.

तिची ती तारांबळ पाहून रामभाऊंना हंसूं आलें. पण त्यानीं तें फारसें बाहेर दिसूं न देतां थट्टेच्या स्वरात म्हटले, " तुम्ही अलीकडच्या पोरी बुवा फारच पुरोगामी अं ! आम्हांला काहीं दाद लागू दिली नाहीं. पण, काय ग त्याच्यासंबंधीं पूर्वचौकशी केलीस ना ! नाव काय त्याचं ? कळूं तर दे आम्हाला. "

पण रामभाऊंच्या या प्रश्नाच्या भडिमारापुढें पमी खूपच गोंधळली. रामभाऊंच्या मनातील हेतूच तिला समजेना. खरंच का त्यांना हें पसंत आहे ? तिला कांहींसा आनंदहि झाला व भीतिहि वाटली.

त्यांना त्याच्यासंबंधीं काय सांगावयाचें ? तिला तरी कुठे त्याची माहिती होती ? धड नावहि माहीत नव्हतें तिला त्याचें !

" लाजतेस होय, त्याचं नांव घ्यायला ? खुळी कुठली ! अग, सारं कांहीं स्वतःच जमवता–प्रेम करतां, अन् नांव घेण्याचे बाबतींत मात्र आमच्यावरहि ताण ! " असे म्हणून रामभाऊंनीं खूपच मोठा हास्याचा स्फोट केला.

" त्यांची मला कांहींच माहिती नाहीं. कुठल्याशा कॉलेजांत असतात वाटतं ते. मीं कधीं नावहि विचारलं नाहीं त्यांचं–" पमीनें खालच्या मानेने कबुली दिली.

रामभाऊंना मनांतून समाधानच वाटलें. त्याना वाटले तितकें प्रकरण हद्दीबाहेर गेलें आहे, असे त्यांना दिसलें नाहीं. पण तिच्या मनाची कसोटी पाहण्याच्या हेतूनें त्यानीं विचारलें—

" काय ग पोरी, त्याचं तुझ्यावर खरंच प्रेम आहे ना ? नाहीं तर गोड गोड थापा मारून तो तुला फसवील बरं का ? लग्नाचं वचन घेतल आहेस का त्याच्याकडून ?" मग ते अर्धवट स्वतः-शींच म्हणाले, " बरं झालं बुवा–पोरीनं मला एका मोठ्या काळजीं-तून मुक्त केलं ! " पुन्हा तिच्याकडे वळून ते म्हणाले, " तुला पसत असेल तर मला ते संमतच आहे–पण हें पहा, त्याला एकदां तसं स्पष्टच विचारून पहा ना–काय ? मी म्हणतों तें खरं कीं नाहीं ?"

" उद्यां सांगेन मी सारं काहीं विचारून. " इतके म्हणून पमी आंत आईकडे पळाली.

दुसरे दिवशीं पमीनें आपल्या प्रियकराकडून विवाहाचें वचन मिळविलें व त्याप्रमाणें तिनें रामभाऊंना सागितलें.

" काय म्हणालीस त्याचं नाव ?–पाटणकर ?- छान !-आपल्याच जातीचा दिसतोय् ! आतां कांहींच काळजी नाहीं म्हणा ! पुढचं मी पाहून घेतो. तोंपर्यंत तूं त्याला भेटू नकोस. आता पुढचं सारं माझ्याकडं लागलं ! "

पमीला त्यांच्या त्या उद्‌गारांमुळें प्रेमाचें साम्राज्यच हस्तगत झाल्याचा आनंद झाला.

पमीच्या प्रेमाची माहिती आपणांस अगदीं वेळेवर मिळाली व भलते-सलतें होण्यापूर्वीच आपण सावध झालों याबद्दल रामभाऊंना समाधान वाटत असले, तरी पमीचा भ्रम दूर कसा करावयाचा याची त्याना विवंचनाच वाटूं लागली होती. म्हणून त्यांनीं त्या बाबतींत हणमतरावाचा सल्ला विचारला. त्यानतर त्यानीं कांहीं एक बेत नक्की ठरविला व त्याचप्रमाणें घडवून आणण्याचें त्यांनीं ठरविलें.

* * *

दुसरे दिवशीं रविवार होता. अगदीं सकाळींच हणमंतराव राम-भाऊकडे आले. त्यानीं पमीला हाक मारली व म्हणाले, "काय पमाताई, तुमची जम्मत आम्हाला सारी काहीं कळली बरं का ?" असे म्हणून ते हसले व मिस्किलपणाने रामभाऊंकडे दृष्टिक्षेप केला. रामभाऊहि हसले. पमी मात्र खूपच लाजली व 'असं हो काय भाऊ, तुम्ही आतांच का साऱ्याना कळविलं ?' अशा आविर्भावानें तिनें रामभाऊंकडे पाहिलें.

"या आनंदाप्रीत्यर्थ रामभाऊ, पमीनं आज आमच्याकडे चहाला आलं पाहिजे व म्हणूनच मी आता बोलवायला आलों आहे."

"तिलाच काय तें विचारा." रामभाऊ तोंडावर मिस्किल हास्य आणीत म्हणाले, "तिनं कुठं मला विचारलं होतं प्रेम कर-ताना नि लग्न जमविताना ?"

"हें काय हो भाऊ ? अशानं मी नाहीं अं !"

"अग नाहीं काय ? मग जातेस ना हणमंतरावाकडे चहाला ?"

"तुम्हीहि पण आल पाहिजे बरं का रामभाऊ ?"

" मला कशाला उगीच ओढतां ! तुमचा आग्रहच असेल आणि पमाताईची परवानगी असेल तर मात्र आपली तयारी आहे. "

आणि मग तीं तिघेहि हणमंतरावाकडे चहाला म्हणून जावयास निघालीं.

गिरगांवच्या नाक्यावर येताच रामभाऊ दाढीवरून हात फिरवीत हणमंतरावांना उद्देशून म्हणाले, " हो खरंच हणमंतराव, तुम्ही थाबता का थोडे बाहेर–मी जरा सलूनमध्यें जाऊन दाढी करून येतों. "

" हो–हो ! या कीं–आम्ही थांबतों समोर आठवले–शहाडे यांच्या दुकानापुढं ! " असें म्हणून पमीसह ते समोरच्या बाजूस जाऊन उभे राहिले व रामभाऊ सलूनमध्ये शिरले.

दहापंधरा मिनिटातच रामभाऊ सलूनच्या दाराशीं आले. हणमंतरावांचे त्यांच्याकडे लक्ष होतेच. पण पमी मॅजेस्टिक सिनेमा-वरील पोस्टरकडे पाहत असल्याकारणाने तिचें रामभाऊंकडे लक्ष वेधावे म्हणून ते जरा मोठ्यानेंच ओरडले, " काय रामभाऊ ? झालं का ? "

अपेक्षेप्रमाणेंच पमीचें रामभाऊंकडे लक्ष गेलें; पण तिला त्या वेळीं जें काहीं दृश्य दिसले ते पाहून तिला खूपच मोठा धक्का बसला. तिचा आपल्या डोळयावर विश्वासच बसेना. तिनें पुन्हां एकदा नीट निरखून पाहिलं; पण तिच्या दुर्दैवानें तें खरें होतें. तिच्या डोळयापुढे अंधेरी आली व आपण आता घेरी येऊन पडतों कीं काय, असें तिला वाटलें. म्हणून तिनें हणमंतरावाचा आधार घेतला व घाई-घाईनें म्हटले, " काका, मला भोंवळ येतेयसं वाटतं–मी नाहीं येत तुमच्याकडे. चला घरींच जाऊं आमच्या. "

तितक्यात रामभाऊहि आले. हणमंतरावांनीं खुणेनें इशारा दिला. दोघांच्याहि चेहऱ्यावर समाधानाचे भाव प्रगट झाले.

आणि त्याच दिवशीं पमीनें आपणाला त्या तरुणाशीं विवाह करायचा नाहीं असें सांगितलें. त्या वेळीं तिच्या चेहऱ्यावर खिन्नता, निराशा, उद्वेग, संताप या सर्वांचें मिश्रण झाले होतें आणि तिच्या नजरेसमोर सकाळचें तें भयंकर दृश्य दिसत होतें—

—तिचा तो 'प्रियकर' सलूनमध्यें रामभाऊंच्या कोटावरून ब्रश फिरवीत असल्याचें तें भयानक दृश्य पाहून तिचें मन फारच अस्वस्थ झालें होतें–सारी रात्र तिनें रडून काढली. आपल्या पहिल्याच प्रेमाचा असा बोजवारा उडालेला पाहून तिने पुन्हां कधींच प्रेमाचें नांव काढलें नाहीं.

---

# युद्धाचा बळी !

वाऱ्याच्या झोतानें उडत आलेला एक रद्दी कागद पद्माकराच्या छातीवर नेमका येऊन बसला. त्याला त्याची मोठी मौज वाटली. अगदीं क्षुल्लक घटना; पण त्यामुळे त्याची विचारशृंखला तुटली. त्यानें तो कागद हातानें दूर केला व पुन्हा तो वाऱ्यावर सोडून देणार तोंच—

"गेल्या महिन्यातील युद्धाचे बळी!" हें शीर्षक सहजगत्या त्याच्या नजरेस पडलें.

कुठल्या तरी मराठी वर्तमानपत्राच्या रद्दीचा तो कपटा होता. त्यावरच युद्धाच्या एका बातमीला वरील मथळा दिला होता. त्यानें ती बातमी निर्विकारपणानें वाचली आणि तो स्वत:शींच खिन्नपणाने हंसला.

युरोपीय युद्धांतील गेल्या महिन्याचे शत्रुमित्र-राष्ट्राचे किती लोक कामास आले याची आकडेवार माहिती त्या बातमींत देण्यांत आली होती.

खूपच मोठा तो आकडा होता—

पद्माकराच्या मनांत चटकन् एक विचार आला—

"या मोठ्या संख्येंत आणखी एका संख्येची भर वास्तविक घालायला हवी होती. युद्धखात्याला कदाचित् ती माहिती मिळाली नसावी; आणि ती कधीं मिळणारहि नाहीं म्हणा! प्रत्यक्ष युद्धभूमीवर कामास आलेल्याची ती माहिती आहे—माझ्यासारख्या अप्रत्यक्षपणें कामास आलेल्या लोकाची मोजदाद कोण आणि किती घेणार?—शक्यच नाहीं ते!"

या एका विचाराने त्याच्या तुटलेल्या पूर्वविचाराची शृंखला पुनरपि जोडली गेली.

आजचा दिवस उगवेल अशी पद्माकराला स्वप्नातहि कल्पना शिवली नव्हती. उलट आपला भविष्यकाल उज्ज्वल आहे अशीच त्याची दिवसेंदिवस दृढ समजूत होत चालली होती—

पण, दिवस उगवावयाचे, त्याप्रमाणेंच दररोज उगवत असतात आणि मावळतहि असतात, पण ते अनेक लोकाच्या जीवनांत घोर क्रांति घडवून मावळत असतात. पद्माकराच्या बाबतींतहि तसेंच घडलें होतें. तो दिवस त्याच्या चिमुकल्या जीवनांत क्रांतिमय ठरला होता—

आणि म्हणूनच त्याच्या उज्ज्वल भवितव्यतेचे हवेंतील मनोरे एकाएकीं कोसळून पडले आणि आजच्यासारखा खडतर दिवस आपल्या आयुष्यात कधीं उगवेल ही कल्पना त्याला कधीं स्वप्नातहि शिवली नसली तरी तीच आतां जागृत सृष्टींत सत्य ठरली होती.

याच आकस्मिक आणि भीषण भवितव्यतेविषयीं विचार करीत तो चौपाटीच्या वाळवंटावर बसला होता.

समुद्रावरून येणारा वारा मोठा सुखदायक वाटत होता; पण तो केवळ मौजेखातर हवा खाण्यासाठीं येणाऱ्या लोकांना ! प्रभाकराला त्याचें सुख कुठलें ? घराला लागलेली आग विझायला वाऱ्याचा कधीं उपयोग होत नसतो–त्यावर पाण्याचाच मारा हवा असतो ! माणसाच्या हृदयाची आच देखील बाहेरच्या वाऱ्यानें विझूं शकत नाहीं–त्यासाठीं सहानुभूतीचाच ओलावा हवा असतो !

पण, हा सहानुभूतीचा ओलावा आज सकाळपासून त्याला कोणाकडूनच लाभला नव्हता; उलट जो तो त्यालाच दूषण देत होता आणि उपदेशाच्या मिठाचे पाणी त्याच्या जखमी हृदयावर ओतीत होता !

कोणी म्हणत होते–" छान झालं ! मोठेपणा पाहिजे नाहीं का ? भोगा म्हणावं आता आपल्या कर्माचीं फळं ! "

दुसरे कोणी म्हणत– " सांगितला होता कोणी त्याला हा उपद्व्याप करायला ? आपली नोकरी बरी नि आपण बरे ! दुसऱ्यावर करायला गेले उपकार; पण लोकांनीं केला ह्यांचाच धिःकार ! "

आणखी कोणी म्हणत होते—" नोकरी सांभाळायची बेट्याला अक्कलच नव्हती. इतका गोरगरिबांचा कळवळा आला होता तर द्यायचे होते स्वतःच्या पगारातले पैसे त्यांना–पण, मालकाच्याविरुद्ध चिथावणी म्हणजे–ही काय माणुसकी झाली ? "

यापेक्षा किती तरी कटु वाक्प्रहार त्याला, आधींच विव्हल झालेल्या हृदयावर झेलावे लागत होते. त्याच्याविषयीं कोणीच चांगलें बोलत नव्हते. त्यालाच दोषी ठरवीत होते. कोणाचीच त्याला सहानुभूति नव्हती—

आणि जे कोणी दाखवूं शकले असते ते मुग्ध होते. मन मारून त्यांनीं मुग्धता स्वीकारली होती. कोरडी सहानुभूति व्यक्त करायलादेखील ते भीत होते. आपलीदेखील कदाचित् हीच स्थिति होईल

याचें त्यांना भय वाटत होतें. हातावर त्यांचें पोट होतें. घरीं चार कच्चींबच्चीं होतीं–कोणाच्या घरीं त्यांबरोबरच म्हातारे आईबापहि असतील. त्या सर्वांचे ते पोशिंदे होते; आणि म्हणूनच ते पद्मा-कराला उघड उघड सहानुभूति दाखवूं शकत नव्हते. नव्हे, त्याच्याशीं आपला कसलाच संबंध नाहीं असेंच ते दाखवीत होते. तसें दाखविल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. माणूस माणसाचा वैरी नसतो–परिस्थिति असते! येथून तेथून सारेच परिस्थितीचे दास–आणि म्हणूनच तो कामगारांना दोष देत नव्हता, मुख्य व्यव-स्थापकानाहि दोषी समजत नव्हता. दोष होता परिस्थितीचा!

"...आपले व्यवस्थापक–मोहनराव किती गोड स्वभावाचे नि मनमिळाऊ वृत्तीचे वाटत होते आपल्याला! आपल्याशीं किती सज्जनपणानं नि आपुलकीन वागत असत पण; त्याच्या मनांत आपणा-विषयीं किल्मिष आलं, ईर्षा निर्माण झाली, मत्सर वाटूं लागला. याचा सारा दोष परिस्थितीचा आहे. त्यांचा नाहीं! पुढे मागें मी त्याना डोईजड होईन, त्याचें आसन डळमळीत होईल ही भीति त्याना वाटली असणे संभवनीय आहे. वास्तविक मोहनराव दुष्टस्वभावाचे नव्हते–परिस्थितीनेंच त्याच्या मनात द्वेष पसरविला आणि मग ते दुष्टाहून दुष्ट नि काळाहून कर्दनकाळ झाले! हा मनुष्य स्वभा-वच आहे!..."

त्याला त्या वेळीं दिवाकराच्या 'राव मेले, पंत चढले' या नाट्यछटेची आठवण झाली. वरचा इसम पडल्याचे दुःख ओस-रते न ओसरतें तोंच खालच्याला वरचे स्थान मिळाल्याचा आनंद होत असतो; पण इथें तर काय? वरच्यालाच आपल्या आसनाच्या स्थैर्याची भीति वाटत होती–मग ती खरी असो वा खोटी असो. हिंदुस्थानचे शहानशहा मोंगल सम्राट याना देखील वाटत असे कीं, आपलीं मुलें बंड करतील नि आपणाला राजसिंहासनावरून

खालीं ओढतील. हीच भीति सर्वांना वाटत असते ! मोहनरावाना देखील तेंच भय वाटलें असावें ! आपलें राजसिंहासन निर्वेध असावें यासाठीं औरंगजेबानें नाहीं का प्रत्यक्ष पित्याला कारावासांत ठेवलें नि भावांना ठार मारलें ? मग मोहनराव तर एक क्षुद्र माणूस ! त्यालाहि आपल्या आसनाची काळजी वाटावी हे स्वाभाविकच होतें. त्यांतूनहि त्याच्यासारखा दुबळा नि अकर्तृत्ववान प्राणी ! दिवाभिताला सूर्याचे तेज कधीं सहन का होत असतें ?...

पद्माकर आणखी किती तरी अशाच तऱ्हेचे विचार करीत बसला असता; पण कोणी तरी त्याच्यासमोर एकदम येऊन उभे राहिलें आणि त्यानें " राम राम साहेब " म्हणून नमस्कार केला.

पद्माकराची विचारशृंखला तुटली आणि तो एकदम बावरला. चौपाटीवरील ' ब्लॅक औट 'मुळे आपणासमोर एकदम कोण येऊन उभा राहिला हे त्याला समजलेच नाहीं ! कोणी एखादा मवाली तर नाहीं ना अशीहि एक शका त्याच्या मनात येऊन उभी राहिली म्हणून त्याच्याकडे तो निरखून पाहूं लागला.

" साहेब–वळखलं न्हाई व्हय् मला ? मी तो शिरपा मिस्त्री न्हव का ? "

" कोण श्रीपतराव वाटतं ?–मी ओळखलंच नाहीं तुम्हाला या काळोखात ! "

आपल्याच कारखान्यांतील श्रीपति मिस्त्री आपणासमोर उभा आहे हें पाहताच पद्माकराच्या मनात पुन्हां विचाराचें वादळ सुरू झालें आणि तो दहापाच क्षण काहींच बोलला नाहीं.

" बसा ना श्रीपतराव खालीं ! का घाई आहे घरीं जायची ? '

" तशी घाई न्हाई साहेब...पन हें असं वो कस झाल ?–लई वंगाळ झालं, पगा साहेब ! कारखान्यांतील एकन एक मानूस हळहळ तोयू पगा तुमासाठीं–" मनांतलें दुःख व्यक्त करीत श्रीपति म्हणाला

" चालायचंच ! आपलंच नशीब खोटं त्याबद्दल कोणाला दोष द्यायचा ? "

" आपलं नशीब कसलं खोटं आलंय् साहेब ? हा सारा हलकटपणा त्या धाकट्या साहेबाचाच हाये पगा—म्हमादेवीची शपथ खोटं न्हाई सागत मी. थोरलं साहेब मनाचे लई दिलदार हायेत पगा. कामगार म्हंजे त्यांना आपल्या घरच्यासारखंच वाटतात. कधीं कोनाला टाकून बोलायचे न्हाईत कीं कुनाचं आपणहून लुकसान करायचे न्हाईत—हा सारा डाव त्या मोहनरावाचाच हाय !"

" कोणाचा का असेना—पण, मी मात्र तुमच्यासाठीं कांहींच करूं शकलों नाहीं याचं मला राहून राहून वाईट वाटतं ! "

" त्यात वाईट वाटून काय घ्यायचं साहेब ! पन, आमच्यापायीं तुमची सोन्यासारखी नोकरी मात्र हाकनाक गेली—"

" तुमच्यामुळें गेली असच नाहीं कांहीं ! त्यात मालकाची तरी काय चूक आहे ? ज्यात त्याचा फायदा होईल तेंच ते पहाणार नि करणार. सध्या लढाई चालू आहे. हेच दिवस त्याचे पैसे मिळवायाचे आहेत. अशा वेळीं महागाईभत्ता तरी ते कुठून नि कसा देणार ? "

" अस कसं म्हनता साहेब ? उलट लढाई चालू झाली म्हूनच त्यांचा धदा बी जोरकस चालला हाये नि मिळकत बी वाडलीया—मंग आम्हा गोरगरिबाची बी मजुरी नग कां वाडवायला ? अन् तुमी तरी ह्याऊन जास्त काय मागत व्हतां ? त्यात तुमचा स्वार्थ कुठं होता ? "

" ते सारं खरं आहे, श्रीपतराव ! पण, मालकाची दृष्टि आपल्या दृष्टिहून निराळी असते. "

" न्हाई कोन म्हनतं ? म्हागाई–भत्ता द्यायचा नव्हता तर तसं सांगायचं होतं, पन त्यासाठीं तुमाला नोकरीवरून काढून टाकायचं कांहींच कारन नव्हतं. "

" हा त्यांचा प्रश्न आहे श्रीपतराव ! "

" न्हाई साहेब, हा तुमचा भलेपना हाये ! तुमचा हा देवपनाच तुमच्या मुळावर आला पगा !–तुमाला म्या मागंच इशारा दिला व्हता कीं–साहेब, तुमी या काळ्या सापापून जपून न्हा म्हून !...भायेरून हंसनाराचे दांत दिसत असले तरी असल्या लोकांचा इशारी दात येगळाच असतो पगा साहेब—आईच्यान खोटं नाहीं सागत ! "

" जाऊं द्या श्रीपतराव ! ज्याची करणी त्याच्याबरोबर ! "

" जाऊं द्या काय साहेब ?–त्यानं हें असं आमचं कराया होवं व्हतं पगा–न्हाई त्याला त्याच्या आईचं दूध आठवाया लावलं असतं तर तुमच्या टांगखालूनच गेलों असतों पगा ! "

त्यावर पद्माकर कांहींच बोलला नाहीं. श्रीपतीचें सर्व बोलणें त्याला पटत होतें; पण त्याचें सुसंस्कृत मन तें बाहेर प्रकट करू शकत नव्हतें इतकेंच !

" साहेब, आता म्होरं तुम्ही काय करनार ? "

" काय करणार ! गांवीं जाणार नि दुसरी नोकरी पाहाणार ! पांथस्थाला काय ? एका धर्मशाळेंतून हुसकून लावले दुसरीकडे जावयाचें–हेंच आपलं कर्तव्य ! "

" मानूसच मानसाचा काळ कसा असतो साहेब, पगा ! एक दिस असा व्हता कीं, थोरलं साहेब तुमच्यावर बेहद ग्वूस होतं–अन् अजूनदेखील त्यांच्या जिवाला ही गोष्ट लागून न्हाइली हाये, पगा ! आज दिसभर त्यांचं तोंड उतरल्यावानी दिसत होतं पगा ! एकदां ते म्हनालेदेखील कीं, ' आज काहीं तरी चुकल्यासारखं–उदास वाटतंय् ! ' तेच आमच्या मोहनसाहेबाचं, पगा–आज साऱ्या कारकून लोकाना त्यानीं चा पाजला–इकता त्याना इजयाचा मद चढलाय् पगा ! "

त्या अप्रिय विषयावर अधिक चर्चा नको म्हणून पद्माकर जागेवरून उठला नि म्हणाला—

" बरंय्, श्रीपतराव ! ओळख देख असूं द्या ! "

" हें काय बोलनं व्हय् साहेब ! तुमी कारखान्यात व्हता तोपतूर कारखान्यात अगदी जीव व्हता पगा–इंजन बंद पडलं म्हंजी जशीं सारीं यंत्रं बंद पडतात तशी आज गत झाली व्हती पगा, कारखान्याची ! तुमची याद राहील पगा आमाला. बरंय् रामराम ! "

असें म्हणून श्रीपति खालीं वाकला. पण, त्याचा हेतु लक्षांत येतांच पद्माकर चटकन् पुढे झाला व त्यानें त्याला मिठी मारली.

त्याला अगदीं गहिंवरून आलें. श्रीपतीच्याहि डोळ्यात पाणी आलें.

पद्माकराला वाटलें–जगात सिंह, वाघ, साप याच्यासारखे क्रूर नि विषारी प्राणी आहेत; त्याचप्रमाणें हरिण, ससे, मोर यासारखे प्रेमळ नि गरीब प्राणीहि आहेत; हा त्या निसर्गाचाच नियम आहे. मोहनरावासारखे स्वार्थी आणि दुष्ट लोक चटकन् ओळखता यावेत यासाठींच श्रीपतीसारख्या थोर हृदयाच्या माणसांचा जन्म असतो. जगांत काळा रंग नसता तर पांढऱ्यालाहि महत्त्व प्राप्त झाले नसते. आता तेंच काळे कधीं कधीं आपल्याहि तोंडाला नाहक फासलें जातें हा त्या नियतीचाच दोष आहे.

पद्माकराने श्रीपतीचा निरोप घेतला आणि तो आपल्या निवासस्थानाकडे जावयास निघाला.

आज रात्रींच्याच गाडीने तो आपल्या गांवीं परत जावयास निघणार होता !–त्याला आता मुंबई भयाण वाटत होती ! इथें आपण अधिक वेळ राहिलों तर सारी मुंबई आपणास खावयाला उठेल अशी त्याला धास्ती वाटत होती.

वाटेल त्या प्रसंगाला भिणाऱ्यापैकीं पद्माकर खास नव्हता. धडाडी आणि शौर्य हे गुण त्याला बाळपणापासून लाभले होते.

अन्यायाचा प्रतिकार करतांना त्यानें कशाचीहि पर्वा आजपर्यंत केली नव्हती. वीराचें तेज, शौर्य नि कर्तृत्व त्याच्यांत होतें. धडाडी बरोबरच कांहींसा कठोरपणाहि त्याच्यांत असला तरी तो कर्तव्यपूर्ती-पुरताच असावयाचा–एरवीं त्याचें मन लोण्याहूनहि मऊ होतें. कारखान्यातील कामगाराबद्दल तर त्याला कमालीची आपुलकी वाटायची! त्याचें सारें जीवनच खडतर नि झगडण्यात गेलें होते; आणि म्हणूनच गोरगरिबांचे कल्याण होत असेल तर तो स्वतःचा बळी द्यावयासहि तयार असे! पण, त्याचा चांगुलपणाच त्याच्या नाशाला कारणीभूत झाला. त्या आत्मनाशाचें त्याला तितकेसें वाईट वाटत नव्हते; नोकरी गेली म्हणूनहि तो दुःखी झाला नव्हता; तर ज्या पद्धतीने त्याची नोकरी गेली, त्याच्याविरुद्ध जीं कारस्थानें रचलीं गेलीं आणि अधारात त्याच्या पाठींत जो अचानक भ्याडपणाने खंजिर खुपसला गेला त्याचाच त्याला संताप आला होता. त्याच्या शत्रूची त्याच्याशीं समोरासमोर दोन हात करण्याची धमक नव्हती म्हणूनच त्यांना अशा प्रकारे शिखंडीचें शिष्यत्व पत्करावें लागले होतें, याचीच त्याला मनस्वी चीड आली होती.

या साऱ्या प्रकरणीं आपल्या मालकाचा काहींच दोष नाहीं याची त्याला बालंबाल खात्री होती. उलट ज्या वेळीं आपल्या हातीं त्यानीं नोटिस दिली त्या वेळीं त्याचें मन खूपच चलविचलित झाले असावे असेच दिसत होतें. हे आपण आपल्या सद्सद्विवेक बुद्धीच्याविरुद्ध करीत आहोंत, हा धडधडीत अन्याय होत आहे हेंच त्याची मुद्रा सागत होती. त्याच्या उदार आणि प्रेमळ हृदयाला, नोटिस देतांना, खात्रीने यातना झाल्या असतील याविषयीं पद्मा-कराला मुळींच शंका नव्हती; आणि म्हणूनच त्याला त्या घटने-बद्दल दुःख नि समाधान दोन्हीहि वाटत होते.

पद्माकराला राहून राहून या विधिघटनेचे नवल वाटत होतें. त्याला आपल्या गावच्या पाणरहाटाची आठवण झाली. पाण्यानें

भरलेला पोहरा वर माथ्यावर येऊन पोंचतांच रिकामा होतो नि मग खालीं खालीं जाऊं लागतो. माणसाच्या भाग्याचेंहि असेंच आहे कीं काय कोणास ठाऊक! तसें नसतें तर चोवीस तासापूर्वी अधिकारावर असलेला पद्माकर या क्षणाला लोकांच्या निंदास्तुतीचा विषय झाला नसता.

एक काळ असा होता कीं, त्याच्या मालकाची त्याच्यावर बहाल मर्जी होती आणि त्याबद्दल लोकांना त्याचेविषयीं हेवाहि वाटत असे. पण, जोंपर्यंत आपण आपल्या कामात चोख आहोत आणि मालकाशीं आपण जोंपर्यंत एकनिष्ठपणें नि विश्वासानें वागत आहोंत तोंपर्यंत आपणास कोणालाच भिण्याचे कारण नाहीं अशीच त्याची भावना होती आणि म्हणूनच इतराप्रमाणे तो मालकाचे पुढें पुढें कधींच गोंडा घोळत नसे. त्याचा हा मानी स्वभाव पाहून मालकहि खूष होते आणि त्यानीं त्याचेविषयीं, त्याच्या काहीं हितचिंतकापाशीं, चागले उद्गारहि काढले होते.

—आणि ते सार्थहि होते. कारण पद्माकर जितका कामसू तितकाच कर्तृत्ववान आणि आपल्या कामात प्रवीण होता; आणि म्हणूनच युद्ध सुरूं होताच आपल्या कारखान्याला आता तेजीचे दिवस येणार हें पाहून त्यांनीं पद्माकराला मुद्दाम बोलावून घेतलें. पद्माकरहि आपली पूर्वीची नोकरी सोडून मुंबईस तातडीने निघून गेला. तसें करतांना त्यानें आपल्या आर्थिक हानीकडेहि पाहिलें नाहीं.

पण—त्याचाच त्याला आतां पश्चात्ताप होत होता.

हा पश्चात्ताप नोकरीबद्दल नव्हता तर ती ज्या कारस्थानामुळें गेली त्याबद्दल वाटत होता.

युद्ध सुरूं होऊन सहा महिने होऊन गेले होते. गिरणीकामगारानीं महागाईभत्त्याची मागणी केली होती. इतरहि कारखाने व गिरण्यां-

तील कामगाराना महागाईभत्ता मिळणार असल्याचे जाहीर झाले होतें. पद्माकर ज्या कारखान्यात होता त्या कारखान्यांतील लोकाचीहि तीच मागणी होती. पण, पुढाकार घ्यावयाचा कोणीं ? पद्माकर हें सर्व काहीं पाहत होता. त्याने सर्व कामगाराचा पुढाकार घेतला व मालकांकडे महागाई-भत्त्याची मागणी केली. मालकानींहि तिचा सहानुभूतीनें विचार करण्याचें आश्वासन दिले.

पण—

रामाला वनवासाला पाठविण्यास बाह्यात्कारी कैकेयी जरी कारणीभूत झाली असली तरी कैकेयीच्या मनात विष कालविण्याचें घोर पातक मंथरेनें केले होतें.

कैकेयी दुष्ट नव्हती.

पद्माकराच्या बाबतींतहि अगदीं तसेच घडून आलें.

पद्माकर कारखान्यात आल्यापासून आणि विशेषतः त्याची दुय्यम व्यवस्थापक म्हणून नेमणूक झाल्यापासून त्याचे वरिष्ठ मुख्य व्यवस्थापक मोहनराव धायबर यांच्या मनांत मत्सराचा डोंब उठला. त्याच्याहिपेक्षा पद्माकराचे तेज अधिक पडूं लागलें, त्याचें कर्तृत्व प्रकट होऊं लागले आणि त्याची हुशारी कळून आली—त्याबरोबर मोहनराव मागें पडूं लागले. त्याना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें लोक पद्माकराची स्तुति करूं लागले. आणि नेमके हेंच धायबरांना सहन झालें नाहीं. आज ना उद्या हा कानामागून येऊन तिखट झालेला पद्माकर आपलीच जागा पटकावील ही सार्थ आणि निरर्थक भीति त्यांना वाटू लागली. सार्थ या अर्थानें कीं, खरोखरच पद्माकर धायबरापेक्षा अधिक कर्तबगार होता आणि एखादंदिवशीं त्यानें त्याची जागा पटकावली असती तर त्याबद्दल कोणालाच आश्चर्य वाटले नसतें; आणि निरर्थक या अर्थानें कीं, पद्माकराचे मनात ही भावनाच कधीं निर्माण झाली नव्हती; ती त्याची महत्त्वाकांक्षा नव्हतीच मुळीं. पण दुर्बल मनच नेहमीं कच खात असतें आणि

म्हणूनच कारस्थानें लढवीत असतें याची पद्माकराला काय कल्पना ?—

पद्माकर शिपाई गडी होता. डावपेंच त्याला माहीत नव्हते. वास्तविक मोहनरावानींच कामगारांना महागाई—भत्त्याबद्दल चिथावून दिलें होते. त्यांचा असाहि अंदाज होता कीं, कामगारांनीं मागणी करताच पद्माकर त्यांचा पुढाकार घेईल आणि मग आपण आपला डाव साधून घेऊं. आणि घडून आलेंहि तसेंच !

पद्माकरानें कामगारांचा पुढाकार घेताच धायबराचीं कृष्ण-कारस्थानें सुरू झालीं. त्यांच्याच कारखान्यात राजपाठक नांवाचे अकौंटंट होते. कारखान्यांतील लोक यांना स्तुतिपाठक म्हणूनच ओळखीत. कारण, मालकाच्यापुढें लाळघोटेपणा करण्याखेरीज हे दुसरे काहींच काम करीत नसत. मालक बिचारे सरळ मनाचे होते. या राजपाठकांच्या मनातील कावा त्यांना कधींच उमगून आला नाहीं. उलट हेच राजश्री आपल्या कारखान्यातील गुप्त आडाखे प्रतिस्पर्ध्यांना सांगत असतात अशी वदंता असल्याचीहि त्याना दाद नव्हती. या सद्गृहस्थांना आणि पद्माकराला प्रथम सारखाच पगार होता. पण पद्माकराची कर्तबगारी पाहून मालकांनीं जेव्हां त्याची पगारवाढ केली—त्यावेळीं या राजपाठकांनीं मनात डूक धरला. तेहि धायबरांना जाऊन मिळाले. आणखी एक दोघेजण त्या कारस्थानांत सामील झाले. त्या दोघांच्या कामाच्या बाबतींतील निष्काळजीपणा पाहून पद्माकरानें त्यानाहि एकदां त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून दिली होती. अर्थात् ते असंतुष्ट जंतूहि धायबरानाच मिळाले.

पण या चौघांनाहि पुरून उरण्याइतपत पद्माकराचें कर्तृत्व श्रेष्ठ होते. त्याच्यापुढें आपले काहींच चालणार नाहीं, मालक आपल्या शब्दाला कांहींच किंमत देणार नाहीं, हें ते चांगलेच जाणून होते आणि म्हणूनच त्यानीं महागाई—भत्त्याचा व्यूह रचला व तो त्याच्या कल्पनेप्रमाणें यशस्वीहि झाला.

ते सर्वजण मालकांपाशीं गेले–

“ महागाईभत्ता आपण कामगारांना देणार आहांत असें ऐकतों–” धायबरांनीं फुत्कार सोडला.

“ हो–द्यायला पाहिजे ! ”

“ पण, देऊन कसे भागणार ? आजपर्यंत कारखाना तोट्यांत चालत होता तेव्हां कुठें कामगारानीं कमी पैशाची मागणी केली ? आज धंद्याला तेजी आहे. पैसे मिळविण्याचे हेच दिवस आहेत...”

“ खरं आहे तें ! पण–महागाई झालीच आहे–तेव्हां—”

मालक अशानें बधत नाहींत हें पाहून राजपाठकानीं मध्येंच तोंड खुपसलें—

“ याच्या मुळाशीं पद्माकरच आहे. त्यानेंच लोकांना चिथविलें आहे. कामगाराची काहीं मागणी नाहीं. हा असला माणूस आपल्या कारखान्यात काय कामाचा ? अन् त्याला ठेवणार असालच तर हा घ्या माझा राजीनामा—”

प्रकरण इतक्या थराला जाईल याची खुद्द मालकानाहि कल्पना नव्हती. ते विचारांत पडले आणि शेवटीं नेमले. त्याच्यापुढें पेंचप्रसंग उभा राहिला. पद्माकर कीं राजपाठक ? राजपाठकाना सोडावयाचें म्हणजे आपल्या कारखान्यांतील माहिती बाहेर फोडली जाणार–त्यापेक्षा......पद्माकर......

पद्माकराच्या नोटिशीवर त्यानीं जड अंतःकरणाने आणि थरथरत्या हाताने सही केली व त्या दिवशींचें वृत्तपत्र त्यानीं डोळ्यापुढें धरलें.

त्याना ‘ युद्धाचे बळी ’ हीच बातमी नेमकी वाचावयास मिळाली.

त्यांच्या मनांत विचार आला–हे युद्धाचे बळी आणि पद्माकर...?

पद्माकरदेखील एक प्रकारें युद्धाचाच बळी नव्हे का ?—

लागलीच मालकाच्या मनापुढें त्या दिवशींचा प्रसंग उभा राहिला—

पद्माकराच्या कामावर खूष होऊन त्यानीं त्याच्या पगारांत वाढ केली होती अन् आश्वासन दिलें होते–तुम्ही आता इथेंच रहायचें; कुठें जायचें नाहीं; तुमचे काम मला पूर्णपणें पसंत आहे–वगैरे– त्या आश्वासनाचे पडसाद अद्यापहि विरले नाहींत तोंच–मी हें केलें ते योग्य कीं अयोग्य ?–एका निरपराध आणि कर्तव्यदक्ष माणसाचा हा बळी—

कोणी घेतला हा बळी ?–मीच कां ?

मालकांचे मस्तक सुन्न झालें !

त्याना काय कल्पना कीं हा जीवनकलह आहे म्हणून ?

युद्धांत जे सैनिक बळी जातात तेदेखील असेच निरपराधी असतात–कालांतरानें त्याची आठवण देखील कोणाला होत नाहीं—

पण–पद्माकराचा जो बळी पडला त्याचे विस्मरण त्यांना कधीं तरी होईल का ?—



# त्यांचें गुपित!

हेरंबशास्त्र्यानीं टेबलाचा खण जशाचा तसा लावला नि ते स्वतः-शींच हंसले. दिवाकराचे कारस्थान अशा प्रकारें एकाएकी आपणास समजून आलें याबद्दलच्या समधानाची छटा त्यांच्या धीरोदात्त आणि गंभीर चर्येवर पूर्णपणे उमटली. छातीवरचें एक मोठेच दडपण दूर झाले असे त्याना वाटले. त्याबरोबरच आपल्या चिरंजिवाच्या खोड-साळ कारवाईचेहि त्याना कौतुक वाटले; आणि हलक्या पावलाने ते आपल्या बैठकीच्या खोलीकडे वळले.

वास्तविक योगायोगानेच त्याना दिवाकराचे ते रहस्य समजलें होतें. त्याच्याऐवजी दुसरा एखादा पिता असता तर त्यानें आकाश-पाताळ एक करून आपल्या मुलाच्या असल्या तऱ्हेवाईक चाळ्या-बद्दल त्याची चागलीच कानउघाडणी केली असती; पण हेरंब-शास्त्री सनातनी वृत्तीचे असले तरी नवयुगाशीं समरस होण्याइतपत त्याच्या मनाची धांव खात्रीने होती. जुन्या-नव्यांचा त्याच्यात सुरेख संगम झाला होता. ‘ जुनें तें सोनें आणि नवें ते हवें ’ असें

म्हणाऱ्यांपैकींच ते एक होते. अर्थात् त्यांना दोन्ही समाजांत यथोचित मान मिळावा हें स्वाभाविकच होतें.

आणि म्हणूनच दिवाकराची कारवाई समजून आली असूनहि त्यानीं रुद्रावतार धारण केला नाहीं कीं संतापानें डोक्यांत राखहि घालून घेतली नाहीं. उलट त्याना दिवाकराच्या कृतीची एक प्रकारें गंमतच वाटली. शिवाय वडिलकीच्या नात्यानें मुलावर वाटेल तशी हुकमत चालविण्याचाहि त्याचा स्वभावधर्म नव्हता—तर उलट कुटुंबांतील प्रेम आणि आपुलकी याना बाध येणार नाहीं असेंच त्याचें वर्तन होतें. त्यानीं आपले देवदेवतार्चन सोडलें नव्हते–तसेच दिवाकर इराण्याच्या हॉटेलांत जाऊन चहा घेतो याबद्दलहि त्याना वाईट वाटत नव्हतें. तेव्हा त्याच्या कुटुंबात नेहमीच समाधानाचें आणि आनंदाचें वातावरण रहावें यांत काहींच नवल नव्हते.

त्या दिवशीं त्यांना कोणालासे एक पत्र पाठवावयाचें होतें. त्याप्रमाणें त्यानीं ते लिहिले आणि पाकिटांत घालून तें डकविलें व त्यावर पत्ताहि लिहिला. पाकिटावर तिकीट लावण्यासाठीं त्यांनीं आपल्या मेजांतून एक लहसा लिफाफा काढला व त्यात ते तिकीट शोधूं लागले; पण, त्याना तिकीट काही सापडले नाहीं. तिकिटा-साठीं त्यांनी आणखीहि कागद चाळले; पण त्यांच्याजवळचीं तिकिटें संपलीं होतीं. त्यांतच त्या दिवशीं रविवार होता आणि पोस्टातहि तिकीट मिळण्यासारखें नव्हतें. म्हणून त्यानीं दिवाकराला हाक मारली–पण, त्यांना तो घरांतच नसल्याचें समजून आलें. म्हणून ते स्वतःच उठले आणि दिवाकराच्या टेबलाच्या खणांत एखादें तिकीट सापडतें कां म्हणून तें पाहण्यासाठीं ते माडीवर दिवाकराच्या खोलींत गेले. खणातच एक लहानशी पत्र्याची सुबक पेटी होती. त्यांतच कदाचित् तिकिटें असतील असें वाटून त्यांनीं ती पेटी बाहेर काढली.

पेटी उघडतांच हेरंबशास्त्र्यांना आश्चर्याचा धक्का बसला. पण,

लागलीच कसलें तरी गूढ कोडें सुटल्याचें समाधान त्यांच्या चर्येवर उमटले आणि जें तिकिट शोधण्यासाठीं ते त्या माडींत आले होते तें विसरून त्यांनीं टेबलाचा खण तसाच, आवाज होऊं न देता लावला व ते मनाशींच हंसले.

वास्तविक दिवाकराच्या टेबलाचा तो खण नेहमींच किल्ली लावून बंद असावयाचा–पण, त्या दिवशीं कसा कोण जाणें तो उघडाच राहिला आणि त्याचे सारे गुपित हेरंबशास्त्र्याना समजून चुकले.

पण, आपणाला कांहीं सुगावा लागला आहे असें मात्र हेरंब शास्त्र्यानीं बाहेर मुळींच दिसूं दिले नाहीं. त्यांचे नित्याचे व्यवहार नेहमींप्रमाणेच चालू होते.

आपल्या टेबलाचा खण उघडला गेला असून आपलं गुपित आपल्या वडिलाना कळले आहे याची दिवाकरालाहि दाद लागली नाहीं.

* * *

आणखी आठ दिवस असेच निघून गेले.

रात्रीचे दहा वाजले होते. दिवाकर आपल्या एका स्नेह्याबरोबर सिनेमाला गेला होता. स्वयपाकघरांत सुशीला आवरासावर करीत होती. हेरंबशास्त्री व गिरिजाकाकू माजघरात कांहीं तरी बोलत होते सुशीला आपल्याच कामात गर्क असल्याकारणानें सुरवातीचे त्यांचे कांहीं भाषण तिला ऐकायला मिळाले नाहीं. पण, तिच्या व दिवाकराच्या नावाचा दोन चार वेळा उल्लेख झाल्यानंतर तिने त्याच्या भाषणाकडे विशेष अवधान दिलें. त्या भाषणाचा आशय ऐकून तर ती विशेषच स्तंभित झाली व दाराआड उभी राहून आपल्या सासू सासऱ्यांचे बोलणें ती धडधडत्या मनानें सारे पंचप्राण एकत्र आणून ऐकूं लागली.

"पण, दिवाकराला आवडेल कां हें आपलं म्हणणं?" सासूबाई शंका प्रगट करीत विचारत्या झाल्या.

" न आवडून कसं चालेल ? त्याला यात काय समजतंय् ? आम्ही करूं ते त्याच्या अनहिताचं का असणार ? " सासरे, सासूची समजूत घालीत होते.

" तसं नाहीं म्हणत मी ! पण, हें असं काहीं करणं लौकिकदृष्ट्या बर दिसेल का ? "

" न दिसायला काय झालं ? अन् शिवाय हे असं तरी बरं आहे का लौकिकदृष्ट्या ?—त्याचा नको कांहीं विचारं करायला ? "

" पण, मला नाहीं वाटत दिवाकर या गोष्टीला संमति देईल असं ! वाटल्यास पहावं विचारून. पण, मला बाई भीति वाटते—आपण करायला जावं एक नि व्हायचं भलतंच ! "

" अग, त्यात काय व्हायचंय् भलतंच ? दिवाकर झाला तरी आपलाच मुलगा आहे कीं नाहीं ? आपल्या शब्दाबाहेर तो थोडाच जाणार आहे ? "

" ते सार खर पण—"

" हे पहा—तूं काहीं काळजी करूं नकोस त्याची. माझं मी पाहून घेतो सार कांहीं. अगदीं आपल्या मनासारख झालं म्हणजे झालं कीं नाहीं ?—अग, ते कांहीं जरी असलं तरी वंश विस्तारासाठीं असं काहीं तरी नको का करायला ? शिवाय तुला नाहीं कां मुलाची हौस ? "

" नाहीं कशी ? तीन वर्षं झालीं दिवाकराच्या लग्नाला. अगोदर, एव्हाना लग्नच करायचं नाहीं म्हणत होता; पण शेवटीं झाला एकदाचा कबूल ! त्याला आता तीन वर्षं झालीं; पण देवानं आमचं काहींच गाऱ्हाणं ऐकलं नाहीं. आमचंच नशिब फुटकं त्याला कोण काय करणार ?—मुल अशीं वाटेवर कां पडतात ?—भाग्यात पाहिजे ना ? " असें म्हणून गिरिजाकाकूंनीं डोळ्याना पदर लावला.

" वेडी आहेस झालं ! अग, म्हणूनच तर आतां आपणाला हा मार्ग पत्करला पाहिजे. "

" पाहिजे खरं–पण, जग काय म्हणेल–दिवाकर काय म्हणेल ? "

" कोणी काहीं म्हणत नाहीं. आताशा असले प्रकार फारसे होत नाहींत म्हणा–पण, त्याला काय इलाज आहे ? स्वर्गातल्या आपल्या पूर्वजाना सद्गति तर मिळाली पाहिजे ना–नाहीं तर बेचाळीस पिढ्या नरकांत जायच्या; त्याची वाट काय ? शिवाय, आजकाल पुन्हा ही रूढि प्रचारात आल्यासारखी दिसतेय् तेव्हां, नाहीं कोणी नांवं ठेवणार आपल्याला ! पुण्या–मुंबईला नि आणखी कितीतरी ठिकाणीं असले प्रकार झाले आहेत म्हणून म्हणतो–दिवाकरानं–देखील दुसरं लग्न केलं म्हणून— "

पण, पुढचे शब्द ऐकावयाला सुशीला तेथें थाबलीच नाहीं. ' मामंजीं'चे ते शब्द तिच्या कानात ॲसिड ओतल्यासारखे शिरत होते व तिच्या काळजाचा भडका उडवीत होते. सासू–सासऱ्यांचें संभापण ऐकण्यास ती नंतर थांबलीच नाहीं. अगदीं हलक्या पावलानें ती मधला जिना चढून वर गेली आणि माडीचें दार ओढून घेऊन तिनें कॉटवर अंग टाकून दिले व उशींत डोके खुपसून मन-मुराद अश्रुमोचन करूं लागली.

तिच्या मनांत नाहीं नाहीं ते विचार येत होते.

असे म्हणण्यापेक्षां विचार करण्यासाठीं तिचे मनच जाग्यावर नव्हतें हेंच खरें !

त्यातच दिवाकरहि त्याच दिवशीं आणि त्याच वेळीं सिनेमाला गेला होता.

जगांत आपण अगदीं असहाय्य–एकाकी आहोंत असें तिला वाटलें.

आपले मामंजी नि सासूबाई किती–किती तरी चांगल्या आहेत असें आजवर तिला वाटत होतें.

पण, आज ?—

साता जन्मींचे वैरी—कसाब आहेत असें तिला वाटलें.

कसाब तरी बरे—सुरीच्या एका फटकाऱ्यासरशीं जनावराचीं मुंडकीं ते उडवीत असतात—पण, आपले मामंजी......! जन्मभर आतां आपला छळ करणार—आपणाला जिवंतपणीं जळत ठेवणार !

तिला ते भयंकर विचार सहनच होईनात.

आणि ते कसे व्हावेत ?—

ती स्वत:ला किती तरी धन्य धन्य समजत होती.

दिवाकरासारखा प्रेमळ मनाचा नि उमद्या दिलाचा पति आणि तितकेच मायाळू सासूसासरे—

शीतल चांदण्यात निश्चल सरोवरातील नौकेसारखाच आपलाहि संसार रम्य अन् काव्यमय आहे असें तिला वाटत होतें. पण, आज—?

त्या रम्य सरोवराला तुफानी दर्याचे स्वरूप प्राप्त झालें आहे आणि आपल्या संसारनौकेचे शीड फाटून ती उलटी होऊं पहात आहे असेंच भेसूर चित्र तिच्या नजरेसमोर उभे राहिलें व तिचा ऊर अधिकच भरून आला.

आणि त्यांतच तिचा जन्माचा जोडीदार—तारणहार—आज घरीं नव्हता.

ती रात्र तिला भयाण वाटूं लागली—जणू काहीं काळरात्रच ! फाशीची शिक्षा झालेल्या कैद्याची जी अवस्था होत असेल, अगदीं तसें तिला होऊन गेलें.

खालीं आणि रस्त्यावरहि सामसूम झालें होतें.

भिंतीवरच्या घड्याळात अकराचे ठोके पडले !

काय ? आकराच वाजले ?—

म्हणजे अजून त्यांना यायला निदान दोन तास तरी अवकाश आहे !—

सुशीलेच्या मनाची काहिली झाली. दुःखभरानें व भावि संकटाच्या भीतीनें तिच्या हृदयांत ज्वालामुखी भडकला आणि अश्रूंच्या रूपानें डोळ्यावाटे त्याचा रसरशीत लाव्हा बाहेर उसळून पडूं लागला.

तिच्या ध्यानीं—मनीं—स्वप्नींहि नव्हतें कीं, आपल्या नशिबात असें कांहीं होईल म्हणून —

तिचा तिलाच स्वतःचा खूप संताप आला.

आपलाच हा दोष—मूर्खपणा आहे !

दिवाकराच्या म्हणण्याला प्रथमच संमति दिली नसती तर ?

पण, आता त्याचा काय उपयोग ?

मामंजी जितके प्रेमळ नि दयाळु आहेत तितकेच ते हट्टी नि दुराग्रहीहि आहेत याचा तिला गेल्या दोन वर्षांत अनुभव आला होता.

त्यांनीं खरोखरच आपल्या विचाराप्रमाणें घडवून आणलें तर ?—

मग आपले किती हाल होणार !

पण, दिवाकर या गोष्टीला संमती देणारच नाहींत —

तिच्या मनानें समजूत घातली.

पण, त्याचा काय नेम सागावा !

तिच्या दुसऱ्या मनाने भीति दाखविली.

शेवटीं रडण्याशिवाय तिला गत्यंतरच नव्हतें—

आणि म्हणून ती दिवाकर येईपर्यंत रडत होती.

बारा वाजले !

एकाचा ठोका पडला —

आणि दिवाकराचीं पावलें जिन्यावर वाजूं लागलीं.

ती अगदीं धडपडून जाग्यावरून उठली आणि अगदीं धांवतच दाराकडे गेली.

दारातच तिनें दिवाकराच्या गळ्याला मिठी मारली आणि जोर-जोरानें हुंदके द्यावयास प्रारंभ केला.

बाहेर जाताना आपल्या बागेतील आवडत्या कुंडींतील फूल टव-टवीत दिसावे पण, परत येतांच तें मलूल होऊन त्यानें मान खालीं टाकावी आणि मग आपणास जसे वाटतें अगदीं तसेंच दिवा-कराला वाटले.

तो अगदीं गोंधळून गेला.

काय बोलावें हेदेखील त्याला समजेना.

म्हणून हळुवारपणानें त्याने तिच्या पाठीवरून हात फिरविला व व तिला कॉटवर नेऊन बसविलें.

त्याचा तो प्रेमळपणा पाहून सुशीलेला अधिकच गहिंवरून आलें; आणि ती आक्रंदून रडूं लागली.

" सुशा–सुशे–वर तोंड कर पाहूं ! काय झालं तें तरी सांगशील कीं नाही ?" दिवाकराच्या प्रत्येक शब्दांत कंप होता. त्याच्याहि डोळ्यात पाणी तरारले होते.

हिंवाळ्यांत कडाक्याच्या थंडींत कमलपुष्पावर दंवाचे खूप थेंब सांचावेत आणि गार वाऱ्याच्या झुळकेनें पानें थरारावींत त्याप्रमाणें तिचीं दोन्हीं नेत्रकमलें अश्रूंनीं डवरलीं होतीं आणि तिची देहलता थरथर कापत होती.

दिवाकराने तिला आपणाकडे अधिकच ओढून घेतलें व जणूं काय आपण एकरूपच आहोंत असें तिला पटवून दिलें.

खिशांतील रुमालानें त्याने तिचे डोळे पुसले व तिची हनुवटी वर उचलून तिच्या नेत्राशीं आपले नेत्र भिडवीत विचारलें,

" सुशीले–तुला कोणी बोललें का ?–काय झालं रडायला ?–सांग ना ? हें बघ–माझ्या काळजाचं किती पाणी–पाणी झालंय् तें ?"

पण, त्याचे हे प्रेमानें ओथंबलेले शब्द ऐकून सुशीलेचेंहि हृदय

अधिकच भरून आलें आणि तिनें त्याच्या कुशींत डोके खुपसलें व ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

.दिवाकराच्याहि नेत्रांतून अश्रू वहात होते.

नदीला आलेला पूर ओसरल्यानंतर जी शांतता पसरते त्याप्रमाणेच मनमुराद रडून घेतल्यानंतर आणि शिवाय आपला दिवाकर आता आपल्याजवळ आहे, आता आपणाला कोणाचें भय नाहीं याची खात्री वाटल्यानंतर तिनें हळुहळू आपल्या सासू-सासऱ्यामध्यें झालेलें संभाषण त्याला थोडक्यात सांगितलें.

तें ऐकून दिवाकरहि गोंधळात पडला.

आपले वडील असा कांहीं अविचार करतील यावर त्याचा विश्वास बसेना.

पण, त्याशिवाय सुशीला इतकी अस्वस्थ होणार नाहीं हेहि त्याला कळून चुकले होतें.

त्याला आता आपल्या वडिलाचा खूपच राग आला.

" माझ्या इच्छेविरुद्ध त्याना असे कांहीं तरी करण्याचा काय अधिकार आहे ? " असें अर्धवट तो स्वतःशीच उद्गारला.

" तरी मी पहिल्यापासून सांगत होतें कीं, अगदीं सुरुवातीपासून आपण हें असं कांहीं करूं या नको म्हणून ! " दिवाकराच्या छातीवर आपले डोकें घाशीत व रुमालाने नाक पुशीत सुशीला म्हणाली.

" पण म्हणून काय झालं ?—त्यांनीं हा अविचार करावा म्हणजे काय ?—मी नाहीं त्याचं ऐकणार प्राण गेला तरी ! "

सुशीलेला त्याचे हे उद्गार ऐकून किती तरी समाधान वाटलें.

वास्तविक या सर्व प्रकाराला फारच चमत्कारिक स्वरूप प्राप्त झालें होते. दिवाकरानें सरळ वडिलापाशीं जाऊन खुलासा केला असता तर सारें कांहीं मिटणार होते; पण तसे कोणत्या

तोंडानें सागावें याचीच त्याला लाज वाटत होती. त्यांच्यासमोर उघड उघड तसें कांहीं सांगण्याचा त्याला धीर होत नव्हता.

आणि त्याचाहि विचार कांहीं वावगा होता असें नव्हे. त्याला आपली कौटुंबिक स्थिति पूर्णपणें माहीत होती. वडिलांचें उत्पन्न असें काहींच नव्हते. त्याला एका शाळेंत चाळीस रुपये पगार होता. आई-वडिलांच्या आग्रहानें बी. ए. झाल्याबरोबर त्यानें आपल्याच पसंतीनें सुशीलेशीं विवाह केला. वकील झाल्यानंतर विवाह करावयाचा हा त्याचा मूळचा विचार होता-पण, तो विचार त्याला अंमलांत आणतां आला नाहीं. म्हणून त्यानें मुलांबाळांचा ताप नको म्हणून सुशीलेच्या संमतीनेंच हा आधुनिक बिनधोक मार्ग पत्करला होता. वकील होऊन आपला जम बसेपर्यंत आपणाला मुलेच होऊं नयेत अशी त्याची प्रामाणिक सदिच्छा होती; पण, त्याचप्रमाणें आपल्या आईवडिलांचीहि आपणाला नातू-नाती व्हाव्यात अशी तितकीच उत्कट इच्छा असेल अशी त्याला काय कल्पना ?—त्यातूनहि सुशीलेला तीन वर्षांनंतरहि देव, देवऋषि, अंगारे-धुपारे, उपास-तापास करूनहि मूल होईना असें पाहून त्यानीं आपल्या दुसऱ्या विवाहाचा विचार केला असल्यास-

पण, दिवाकराला पुढील विचारच असह्य झाले.

ती रात्र त्या दोघानींहि अगदीं तळमळत काढली.

दुसरे दिवशीं—

हेरंबशास्त्र्यानीं दिवाकराला एकीकडे घेऊन आपला विचार त्याचेपाशीं व्यक्त केला.

आपले वडिलच कां हे असे कांहीं बोलताहेत-यावर त्याचा क्षण-भर विश्वासच बसेना.

“ मला आपला हा अविचार मुळींच पसंत नाहीं-तिला मूल होता

नाहीं म्हणून तिच्या मानेवर सुरी फिरविण्याची कसाबकरणी मी मुळींच करणार नाहीं." दिवाकर संतापानें बडबडत होता.

हेरंबशास्त्री मात्र नेहमींप्रमाणेंच शांत होते. उलट त्यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें मिष्किल हास्यच विलसत होतें.

"हें पहा दिवाकर, तुला नसली तरी आम्हाला नाहीं कां—मुलांबाळाची हौस ? तेव्हा म्हणतो—"

"कांहीं म्हणूं नका व मलाहि तें ऐकायचं नाहीं." दिवाकर संतापानें थरथर कापत होता.

"असं रागावून कसं चालेल, दिवाकर ? वंशविस्तार, पूर्वजांची सद्‌गति यांचा काहीं विचार नको कां करायला ? शिवाय सुशी-लेशीं लग्न ठरविताना मी नाहीं का तुझ्या इच्छेला मान दिला ? त्याचप्रमाणें—"

"आता आम्हां दोघांनाहि गळ्यांत गळा घालून नदींत जीव द्यायला सांगा —"

"मी आतांच दुसरें लग्न कर असें सांगत नाहीं—आणखी काहीं दिवस वाट पहायला माझी कांहींच हरकत नाहीं—पण, आम्हां वृद्धा-कडेहि—"

पण पुढचे शब्द ऐकायला दिवाकर त्या ठिकाणीं थांबलाच नाहीं. वडिलाच्या एवढ्या शब्दांवरूनहि त्याला कांहींसें हायसें वाटलें. आपण एका मोठ्या दिव्यांतून पार पडलों असें त्याला वाटलें.

* * *

त्याच रात्रीं त्यानें त्या टेबलाच्या खणांतील पेटींतलीं सारीं उप-करणीं गटारांत फेंकून दिलीं. उशाखालचा विंचूच बाहेर फेकल्या-इतका आनंद सुशीलेला झाला.

——